सामाजिक संगीत नाटक

# सौभाग्य

( अंक तीन )

वसंत जाधव

[ प्राणाचं दान, नवा संसार,
देवता इत्यादि नाटकांचा कर्ता. ]

रामकृष्ण बुक डेपो,
गिरगांव *** मुंबई ४.

प्रथमावृत्ति १९५५

किंमत दीड रुपया



लेखकाचा पत्ता : कुलसुमबाई चाळ नंबर ११३ डी. अक्कलकोट स्वामींच्या मठानजीक, बेगर्स कँपसमोर, चेंबूर-मुंबई नंबर ३८.

प्रकाशक : वि र. बाम, रामकृष्ण बुक डेपो, गिरगांव, मुंबई ४.
मुद्रक : व्यं. रा. शिंगरे, सर्वोदय मुद्रणालय, ४५० बुधवार, पुणे २.

प्रस्तुत नाटकाचे पद्यलेखक—माझे कनिष्ठ बंधु **श्री. अरविंद जाधव** यांस, माझं हें तृतीय नाट्यपुष्प सादर समर्पण ! !

— **नाटककार.**

# सौभाग्य !

या नाटकाचा प्रथम प्रयोग '**विजय कला निकेतन**, वरळी' या नाट्यसंस्थेनें, रविवार दिनांक १३ नोव्हेंबर १९५५ रोजीं रात्रौ ८-३० वाजतां, दामोदर हॉल-परळ येथें करून दाखविला. त्यावेळ भूमिका केलेल्या कलावंतांचीं नांवें:—

| | |
|---|---|
| **बीना** ... ... ... | मनोरमा बेहेरे |
| **लिली** ... ... ... | शालिनी मुरुडकर |
| **अरविंद** ... ... ... | मा. दुर्गादास |
| **नरेन** ... ... ... | सिताराम शिगवण |
| **राजन** ... ... ... | बाळासाहेब यादव |
| **आबासाहेब** ... .... | डी. वासुदेव |
| **दामुअण्णा** ... ... | मा. एन्. देव |
| | |
| **निर्माता** ... ... ... | रघुनाथ जाधव |
| **दिग्दर्शक**... ... ... | डी वासुदेव |
| **सं. दिग्दर्शक** ... ... | रामदास गायकर |
| ... ... | बाबुराव नाईक |
| **पद्यलेखक** ... ... | अरविंद जाधव |
| **सेक्रेटरी** ... ... ... | राजाभाऊ पठारे |
| **हितचिंतक** ... ... | के. देवला शेट |
| **फोटोग्राफर** ... ... | राजा मयेकर |
| **मॅनेजर** ... ... ... | शेठ पांडुरंग गायकर |
| **मेकअप्** ... ... ... | डी. वासुदेव |



निर्माता



सेक्रेटरी



पद्यलेखक



लेखक

# १

[ स्थळ—आबासाहेबांचें घर—वेळ दुपारीं चारसाडेचारची. समोर बाहेरून आंत येण्याचा दरवाजा दिसतो—खेरीज दोन बाजूला दोन खोल्या असतात. उजव्या बाजूला माडीवर जायला जिना असतो. भिंतीवर एका प्रौढ स्त्रीची तसबीर दिसते—इतर सजावट आधुनिक पद्धतीची. पडदा उघडल्यानंतर लिली—आबासाहेबांची मुलगी—वय एकोणीस - बाहेरून आनंदी मुद्रेनें गाणें म्हणत प्रवेशते. तिच्या हातांत पुस्तकें असतात. तसेंच डोळ्यांना काळा चष्मा असतो. ]

क्षण अजि हा भाग्याचा
मजला भासे आनंदाचा
वृक्षलतांना हर्ष जाहला
फळांफुलांना बहर आला
मधु चाखाया भ्रमर गुंगला
भृंगनाद हा रमवी मनाला

( पद संपल्यानंतर लिलीचें लक्ष तस्बिरीकडे जातें. तिचें हृदय भरून येतें. )

**लिली :** ( कारुण्यपूर्ण ) आई—आज माझा वाढदिवस ! एकोणीसावं वर्ष लागलंय् मला—पण माझा वाढदिवस साजरा करण्याची जबाबदारी कुणींच पार पाडली नाहीं. आज जर का तूं असतीस, तर मोठ्या थाटामाटानें माझा वाढदिवस साजरा केला असतास—पण मीच दुर्दैवी म्हणून तुझ्या प्रेमाला पारखी झालें आहें. ज्या दिवशीं तुझ्या प्रेमाचा प्रवाह थांबला—त्याच दिवसापासून आबासाहेबांनीं माझी छळणूक करण्यास सुरुवात केली आहे. त्यांच्याकडून होणारा जाच मला निमुटपणें सहन करावा लागतो आहे. निदान तूं असतीस

तर मायेनं माझ्या डोळ्यांतील अश्रू तरी पुसले असतेस—पण तेवढी देखील मी भाग्यवान नाहीं ! ( अश्रू ढाळते. पदरानें डोळे पुशीत असतानांच बाहेरून राजन प्रवेशतो. राजन—वय पंचवीस—स्वभाव अल्लड तसाच टारगट—वृत्ती बेफिकीर-- वेषभूषा सिनेनटासारखी. हातांत पेटती सिगारेट असते. तो तोंडानें शीळ घालून लिलीला हांक मारतो. नंतर सरळपणें हांक मारतो. )

**राज** : लिऽऽऽली—आज बोलायचं नाहीं म्हणून प्रतिज्ञा केली आहे कीं काय ? अच्छा ! ऑल राईट ! आय ॲम गोईंग—( बाहेर जाऊं लागतो )

**लिली** : ( हांक मारते ) राज--

**राज** : ( मिस्कीलपणें ) ओ हो ! गंगा यमुना डोळ्यांत उभ्या कां ? काय बरं झालं माझ्या गुलाबाच्या फुलाला ?—कां बरं अशा त्याच्या पाकळ्या गळूं लागल्या आहेत ?

**लिली** : राज, तुझ्या गुलाबाच्या पाकळ्या गळत नाहींत, तर त्याचे कांटे बोचूं लागले आहेत !

**राज** : कुणाला ?—कुणाच्या हाताची चामडी लवचीक झाली आहे ? सांग, त्या महाभागाचे हात छाटून, त्याच्या दोनाचे चार हात करून टाकतों.

**लिली** : ( थोड्याशा हंसऱ्या मुद्रेनें ) चल थापाड्या कुठचा—उगाच कांहींतरी बरळूं नकोस.

**राज** : हें पहा, मनाला येईल तें बरळणं हा माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे. तूं थापाड्या म्हटलंस तरी मला मुळींच राग येणार नाहीं. कारण कुणी मला देवआनंद, राजकपूर, अशोककुमार, दिलीपकुमार म्हणून पदवी देतात—तर कांहीं दीडशहाणे मला बेदिक्कतपणें चारसोबिस म्हणायला देखील कमी करीत नाहींत.

**लिली** : अहो राजकपूर—दिलीपकुमार, अगोदर इथली आपली शूटींग आवरा आणि मुकाट्यानं दुसरा स्टुडिओ धुंडा—नाहींतर आबासाहेबांच्या डायरेक्शनखालीं आपली शूटींग पार पडायची.

**राज** : कुछ वांदा नहिं. आजपर्यंत तुझ्या आबासाहेबांना मी भीत होतों. त्यांच्या तुफानी गोलंदाजीनं नेहमींच माझा त्रिफळा उडायचा—पण हा पट्टीचा

फलंदाज ह्यापुढं सेंच्युरी लावल्याशिवाय रहाणार नाहीं ! अगदीं समोरासमोर सामना खेळणार आहें !!

**लिली** : ( समजावून ) तसं नाहीं राज—आधींच सकाळपासून आबा· साहेबांचं भडकलेलं माथं अधिक भडकेल !

**राज** : तूं त्याची मुळींच काळजी करूं नकोस. एका क्षणांत त्यांच्या माथ्याचं चायना आईस्क्रीम करून टाकतों.

**लिली** : कसं तुला आतां समजावून सांगूं ? अरे आज आमच्या घरांत वादळ उठलं आहे.

**राज** : कांहीं हरकत नाहीं—त्या वादळांतून आपली प्रेमनौका हांकण्यास हा नौजवान नावाडी एका पायावर तयार आहे !

**लिली** : हो पण आबासाहेबांच्या संतापाचा सागर उसळला आहे. त्याची काय वाट ? तुला ह्या क्षणाला आबासाहेबांनीं इथं पाहिलं, तर माझी कांहीं धडगत नाहीं. ( त्याच्या दंडाला धरून ) म्हणून म्हणतें राज, ह्या क्षणाला इथून जा—

**राज** : छट् ! हा लोखंडाचा ठोकळा तुझ्या कोमल हाताच्या धक्क्यानं जागचा मुळींच हालणार नाहीं ! !

**लिली** : असा हट्टाला पेटूं नकोस राज ! प्रेमाचं मंदिर नेहमीं पायरी पायरीनं चढावं—नाहींतर कड्यावरून कोसळणाऱ्या दगडाप्रमाणं, दणदणीत आपटायला व्हायचं.

**राज** : प्रेममंदिराच्या पायऱ्या चालतां चालतां केव्हांच संपून गेल्या आहेत. आतां फक्त ह्या प्रेमदेवतेच्या गळ्यांत मंगळसूत्ररूपी हार घालायचा बाकी राहिला आहे ! ( तिच्या गळ्यांत हात घालतो. )

**लिली** : ( त्याला दूर लोटून ) चल दूर हो. बोलूं नकोस माझ्याशीं ! ( रुसते ).

**राज** : हें पहा, असा तोंडाचा चंबू करून गालाचा फुगा फुगवूं नकोस—नाहींतर रॉकेलच्या पंपानं मला त्यांतली हवा बाहेर काढून घ्यावी लागेल !

**लिली** : ( चिडून ) राज—

**राज :** अजून जरा मोठ्यानं हांक मार! तूं ज्या प्रमाणांत चिडली जाशील, त्या प्रमाणांत तुझ्या गालावरचे गुलाब फुलले जातील ...... त्यांचा सुगंध दशदिशांना दरवळेल ... त्या सुगंधी वातावरणांत प्रेमानं मी धुंद होऊन जाईन !!

**लिली :** फाजीलपणा पुरे झाला. आतां जर का तूं इथून गेला नाहींस, तर ह्यापुढं एक शब्दहि मी तुझ्याबरोबर बोलणार नाहीं. ( बसते ).

**राज :** ( तिच्याजवळ बसून ) अग पण असं रागवायला काय झालं? काय असेल तें असो ! तुम्हां तरुण पोरींचं नटणं, थटणं, नाचणं, मुरडणं पाहिलं, कीं तरुण पोरांच्या काळजाचे तडातड तुकडे उडतात. तीक्ष्ण टोंकाचा बाण लागून घायाळ होणाऱ्या कबुतराप्रमाणें त्यांना प्रेमाची तिरीमिरी येते ! त्याला मी तरी कसा अपवाद असणार ?

**लिली :** ( चिडून ) म्हणून काय आपल्या प्रेमाची जाहिरात पावलो-पावलीं करायला नको. मला ठाऊक आहे, तुझं माझ्यावर प्रेम आहे तें !

**राज :** ठाऊक आहे म्हणजे काय ? असायलाच पाहिजे. अग ज्याप्रमाणें दिग्दर्शक नाटकांतील प्रेमप्रसंगाचा फायदा उचलून, खुशाल नटीला प्रेमाचं दिग्दर्शन करीत असतो, त्याचप्रमाणें पिकलेल्या टॉमॅटोसारखे लालबुंद गाल, बटाट्यासारखे बटबटीत डोळे, पोपटाच्या चोचीप्रमाणें असणारं बांकदार नाक आणि घोड्याच्या शेपटीप्रमाणें असणारा तुझा केशसंभार पाहून मी माझ्या प्रेमाचं प्रदर्शन करतों आहें.

**लिली :** हो हो तर ! हें काव्यगायन आमच्या आबासाहेबांना ऐकव जा—

**राज :** तर मग भितों कीं काय ? आणि तुला आतांच बजावून ठेवतों, आपल्या प्रेमाची मालगाडी हांकून लग्नाचं स्टेशन गांठायचं असेल, तर अगोदर तुझ्या आबासाहेबांची रेडसिग्नलची तार तोडली पाहिजे. तुझ्या माझ्या खुशीचा हिरवा बावटा दाखवून, ती प्लॅटफॉर्म सोडणं शक्य नाहीं.

**लिली :** ( त्रासिक मुद्रेनें ) समजलं रे ! पण—

**राज :** पण काय ?—आणि हो, हा जो तुझा मध्येंच 'पण' नाचतो आहे त्याचं डिपॉझिट अगोदर जप्त झालं पाहिजे—म्हणजे आपल्या प्रेमाच्या निवडणुकींत, उमेदवार म्हणून तो कधींहि उभा रहाणार नाहीं !

**लिली :** आतां...आतां कसं समजावूं रे तुला ?

**राज :** असं एरंडेल प्याल्यासारखं तोंड करूं नकोस. पाहिजे असल्यास माझ्या ओठावरची साखर चाखून खा !

**लिली :** ( रागानें ) राज—भलत्याच वेळीं चावटपणा करूं नकोस.

**राज :** अग पण आबासाहेबांना एवढं घाबरायला काय झालं आहे ? लग्न करणं हा तुझ्या न् माझ्या खुषीचा प्रश्न आहे ! " मिया बीबी राजी, तो क्या करेगा बुढ्ढा काजी ? "

**लिली :** स्त्रिया जन्मतांच भित्र्या असतात राज !—तुला स्त्रियांच्या अंतःकरणाची पारख नाहीं—

**राज :** कारण मी पुरुषासारखा पुरुष आहें !

**लिली :** म्हणूनच म्हणतें, पाषाणहृदयी पुरुषांनीं स्त्रियांच्या अंतःकरणाची पारख केली तर—

**राज :** आतां तुझी ' तर ' आली. हें पहा, तर बीर कुछ नहिं. तूं फक्त इशारा करण्याचा अवकाश, कीं एका क्षणांत तूं सांगशील तिथं तुला पार्सल करतों !

**लिली :** तूं जा पाहूं इथून—नाहींतर मी तरी जातें कशी ! ( जाऊं लागते )

**राज :** जा—खुशाल जा—माझ्या करमणुकीला तुझ्यासारखं प्रेमाचं बाहुलं नसलं, तरी गोल्ड फ्लेकच्या पाकिटांत भरलेलं चारमिनार सिगारेट तर आहे ना ?—( सिगारेट काढून पेटवतो ) थांबलीस कां ?—जा खुशाल जा, सिग्नल—डाऊन आहे. दुसरी गाडी येईपर्यंत तिकीट चेकर म्हणून ह्या घरांतल्या वस्तू मी चेक करीत बसतों. अरेच्या ! अजूनहि गाडी जागची हालत नाहीं ? मला वाटतं गाडीचं इंन्जीन बिघडलेलं असावं, अगर कुणीं तरी बुद्दु पॅसेंजरनें गाडीची चेन खेचलेली असावी.

**लिली :** किती रे खट्याळ आहेत तूं ! खरं सांगतें मी राज, आज सकाळपासून आबासाहेबांच्या रागाचा पारा चढला आहे—

**राज :** म्हणून थोडाच तुझ्या व माझ्या प्रेमाचा पारा उतरणार आहे ?

**लिली :** मला बोलूं देशील कीं नाहीं ?

**राज** : तुला जर माझ्याबरोबर बोलायचंच असेल, तर आतांच्या आतां वरली सी फेसला यायला पाहिजे. अग, तुझ्याबरोबर मला पुष्कळ बोलायचं आहे. उद्यां सकाळच्या गाडीनं मी कलकत्त्याला जाणार आहें—ठाऊक आहे ना? महिना—दीड महिना तिथं रहाणार आहें मी!—म्हणून म्हणतों, दीड महिन्याच्या बोलण्याचा वचपा एका दिवसांत काढून घेऊं या.

**लिली** : पण गेला नाहींस तर नाहीं का चालणार?

**राज** : कसं शक्य आहे तें? माझी मावशी फार आजारी आहे. एकटीच आहे ना—म्हणून तर तिनं मला रहायला बोलावलं आहे. तिच्या समाधानाकरितां एक दीड महिना रहातों. तिचं माझ्यावर फार प्रेम आहे! आणि खरं सांगूं का, तिच्या इस्टेटीवर माझा डोळा आहे! अग मध्येंच जर आटपली तर सोन्याहून पिवळं होईल! ( मध्येंच ) हो, पण तूं येतेस कीं नाहीं?

**लिली** : आलें असतें रे पण...( घुटमळते )

**राज** : ( कृत्रिम रागानें ) पुन्हां पण? डिपॉझिट जप्त झालेला उमेदवार, बेशरमपणें पुन्हां उभा रहातो याचा अर्थ काय?

**लिली** : ( रडकुंडीला येऊन ) तुला सगळीच थट्टा वाटते आहे! पण इथं आबासाहेबांच्या भीतीनं माझा जीव गुदमरतो आहे—

**राज** : माझ्या प्रेमाची उब मिळाल्यावर पुन्हां त्याला टवटवी येईल! चल पाहूं—

**लिली** : अरे पण थांब ना—मला कपडे बदलूं देशील कीं नाहीं?

**राज** : अं हं! चौपाटीवर थंडी वाजण्याची भीति वाटत असेल तर हा माझा उलनचा कोट घाल—( कोट काढतो ) अग रबरी फुग्यासारखे गाल काय फुगवतेस? नाहीं ऐकत? अच्छा! मीच तुझ्या अंगांत कोट चढवतों! ( तिच्या अंगांत कोट चढवतो व तिच्या डोक्यांत स्वतःची फेल्ट हॅट घालतो ) ओ हो! आतां फक्त तुला मिशी असती, तर बिलकूल गोव्याचा सायबा दिसली असतीस!! ( थट्टेनें ) हॅल्लो मि. दादर बंबखानावाला! ( तिचा हात धरून हालवतो. इतक्यांत बाहेर आबासाहेब "आलों आलों—दत्तोपंत, थोड्याच वेळांत परत आलों हं" असें बडबडतात. राज व लिलीची तिरपीट उडते ).

**राज** : अरे बापरे ! ( लिलीच्या अंगांतील कोट काढून घेतो ).

**लिली** : अगबाई ! आबासाहेब येताहेत वाटतं !

**राज** : ( धांदरटपणें ) अग पण मी बाहेर कसा जाऊं ?

**लिली** : हें पहा, तूं थोडा वेळ स्वयंपाकघरांत लपून रहा...नंतर मी तुझ्या जाण्याची व्यवस्था करतें–जा पाहूं–( तो डाव्या बाजूच्या खोलींत लपतो. ती पुस्तक वाचीत बसते. आबासाहेब तावातावानें बडबडत बाहेरून प्रवेशतात. )

( आबासाहेब : लिलीचे वडील-वय ५५ वर्षे-स्वभाव तिरसट, करारी, वृत्ती–एककल्ली, खोट्या प्रतिष्ठेचा टेंमा मिरावेण्याची संवय ).

**आबा** : लेकाच्यांना फुकटचीं नाटकं पहायला पाहिजेत ! व्यासपीठावर उभं राहून बोलणं म्हणजे पोरखेळ समजतात लेकाचे-पण ह्या आबासाहेबाच्या वाटेला जाल तर एकेकाचा नक्षा उतरवीन म्हणावं ! ( लिलीला पाहून ) हं नशीब माझं कीं तूं आज वेळेवर हजर आहेस. पहातेस काय माझ्या तोंडाकडे ? मुकाट्यानं अभ्यास कर–( उजव्या बाजूच्या खोलींत जातात. नंतर थोड्याच वेळांत राज दुसऱ्या खोलींतून चोर पावलानें प्रवेशतो ).

**राज** : लिली, जातों मी–आतां तुझी माझी भेट...

**लिली** : होईल कधींतरी ! आणि हें पहा, कलकत्त्याला पोहोंचल्यावर पत्र पाठवायला विसरूं नकोस हं ! जा पाहूं—

**राज** : ( मानेनें नकार देऊन ) ऊं हूं !

**लिली** : राज, तूं माझा ना ? ( लाडिवाळपणें त्याच्या गालावरून हात फिरवते ).

**राज** : ( खुश होऊन ) ए बात है ! अच्छा ! गुड बाय ! ( बाहेर जातो. इतक्यांत त्याच्या मागोमाग आबासाहेब प्रवेशतात ).

**आबा** : लिली, आतां कोण बोलत होतं तुझ्याबरोबर ?

**लिली** : (भांबावून) अं ? कुठं ?...कधीं ?...कुणीं नाहीं...कुणीं नाहीं !

**आबा** : ( चिडून ) तर काय भिंतीला वाचा फुटली होती ? चल चालती हो इथून—( जाऊं लागते ) चाललीस कुठं ? चहा तयार आहे ना ?

**लिली** : नाहीं.

**आबा** : म्हणजे आतां जवळजवळ पांच वाजायला आले, तरी चहा तयार नाहीं ? ह्या घरांत कुठली गोष्ट वेळेवर झाली आहे, असं निदान मला तरी आठवत नाहीं.

**लिली** : असा त्रागा करून काय होणार आहे ? मी करतें चहा. थोडावेळ थांबा. प्रत्येक गोष्ट वेळेवर व्हायला घरांत कुणीतरी स्वतंत्र बाई माणूस पाहिजे ना ? आतांच तर मी कॉलेजमधून आलें आहें.

**आबा** : ( चिडून ) मोठी मेहेरबानी केली आहेस माझ्यावर ! बरोबर दोन वाजतां कॉलेज सुटतं – मग इतका वेळ कुठं भटकत होतीस ?

**लिली** : कॉलेजांतून परस्पर शिवणक्लासला गेलें होतें.

**आबा** : एक दिवस गेली नसतीस तर चाललं नसतं ? पण तुला घरची काळजी कुठं आहे ? आणि नऱ्या कुठं तडफडतो आहे ?

**लिली** : ( गांगरून ) मला वाटतं माडीवर नाटक लिहीत बसला आहे.

**आबा** : लिही म्हणावं; आयुष्यभर नाटकंच लिहीत बस. अशीं नाटकं लिहून पोटं भरलीं असतीं, तर नाटककारांच्या हातांत भिकेची करवंटी कां आली असती ? ( तावानें ) म्हणे नाटक लिहितो आहे !

**लिली** : ( वाईट वाटून ) रागावूं नका आबासाहेब ! मी चुकलें. वेळेवर मी घरीं आलें असतें तर एवढीं बोलणीं मला ऐकून घ्यावीं लागलीं नसतीं.

**आबा** : (गैरसमज करून) नाहीं नाहीं, म्हणजे बोलणारा मी मूर्ख आहें !

**लिली** : किती गैरसमज करून घेताहांत आबासाहेब ! ( कंठ दाटून ) आज आई असती तर तुम्ही माझ्यावर केलेले वाक्प्रहार तिला मुळींच सहन झाले नसते–पण ती मला ...भावड्याला...अरुदादाला सोडून केव्हांच स्वर्गवासी झाली आहे. ( त्राग्यानें ) खरं म्हणजे तुम्हींच तिला ह्या जगांतून नाहींशी केलीत ! ( तोंड दाबून रडते ).

**आबा** : ( दटावून ) लिली—

**लिली** : (संतापानें) आज स्वतःला प्रतिष्ठित समजणारे तुम्ही–त्यावेळीं दारु पिऊन एखाद्या पिशाच्याप्रमाणें घरांत थैमान घालीत होतां–आपल्या पशुतुल्य वर्तनानें आईचा छळ करीत होतां !! लग्नानंतर तुम्ही कितीसं सुख दिलं होतं

तिला ? सधवा असून एखाद्या विधवेप्रमाणें जीवन जगत होती ती ! पण तुम्हांला कुठं तिची काळजी होती ? ( कंठ दाटून ) अखेरीस बिचारी आम्हांला सोडून कायमची निघून गेली. ( अधिक संतापानें ) तुमच्या छळण्याचें साधन तुमच्या हातून निघून गेल्यावर, तो प्रयोग तुम्हीं स्वतःच्या मुलीवर—माझ्यावर चालू ठेवला आहांत——

**आबा** : ( रागानें ) लिली—तुझी जीभ फार सैल सुटत चालली आहे !

**लिली** : ती सैल सुटलेली नाहीं, तर आजपर्यंत सहन केलेल्या मुक्या माराला आधण आलं आहे. तुमच्या मताप्रमाणें अरुदादा वागत नव्हता, म्हणून तुम्ही त्याला घराबाहेर काढलंत——आज जवळजवळ त्या गोष्टीला चार वर्षे झालीं आहेत—पण एकदां तरी तुम्हीं त्याची चौकशी केलीत कां ? अपत्य प्रेमाचा ओलावाच जर तुमच्या हृदयांत नाहीं तर तुम्हीं त्याची चौकशी तरी कशाला कराल ?

**आबा** : प्रत्येक वेळीं बापाला दुरुत्तरं करणाऱ्या मुलाचं तोंड पहाण्याची माझीं मुळींच इच्छा नाहीं. तुला सुद्धां बजावून ठेवतों, जर यापुढं माझ्याबरोबर तोंडाचा पट्टा चालवशील, तर अरुप्रमाणें तुलाहि घराचा दरवाजा बंद करण्यांत येईल !

**लिली** : ( बेफिकीरीनें ) तसं होईल तर फार बरं होईल ! निदान ह्या नरकवासांत राहून मनाचा कोंडमारा करून घेण्यापेक्षां स्वच्छंदानें जीवन तरी जगतां येईल ! वेळप्रसंगीं अरुदादाप्रमाणें मी देखील माझ्या कर्मानंच जगेन आणि कर्मानंच मरेन ! !

**आबा** : अस्सं ! दारोदार भीक मागण्याची पाळी आली नाहीं म्हणजे मिळवलीस. मुलींना शिक्षण दिलं म्हणजे त्या शेफारल्या जाऊन आईबापाच्या डोक्यावर चढतात, हें आतां मला पटूं लागलं आहे. हें पहा, उद्यांपासून तुझं कॉलेज बंद ! अति शिक्षणानं तूं फार चढेल झाली आहेस. आपल्या मुलीला एका प्रतिष्ठित गृहस्थाची मुलगी, ह्या नात्यानं लोकांनीं ओळखावं म्हणून तुला शिक्षण देण्याचा मी प्रयत्न केला—पण तूं तर माझ्याच डोक्यावर मिरी वाटूं लागली आहेस. खबरदार उद्यांपासून घराबाहेर पडशील तर !

**लिली** : ( दुःखानें ) तुमच्या अन्यायाचा पाढा तुम्हांला वाचून दाखवला, म्हणून तुम्हीं त्याचा सूड अशा तऱ्हेनें उगवतां ? ( विनवून ) नका—नका, आबासाहेब, असा अविचार करून माझं शिक्षण अर्धवट बंद करूं नका. मला फार...फार शिकायचं आहे.

**आबा** : झालं एवढंच फार झालं आहे. तुझ्या शिक्षणाचा प्रभाव मला आतांच कळून चुकला आहे. अल्प शिक्षणाची धुंदी चढलेल्या आजकालच्या तुम्हां पोरांना, आईबाप म्हणजे हमरस्त्यावर धूळ खात पडलेले पत्थर वाटतात—कुठल्या तरी झाडाचीं सुकलेलीं पानें वाटतात नाहीं ?

**लिली** : नाहीं—नाहीं, माझ्या चढेल वर्तनामुळें तुमचा गैरसमज झाला आहे. मी चुकलें ! मला क्षमा करा आबासाहेब—

**आबा** : म्हणे क्षमा करा ! चल दूर हो ! ( तिला लोटून आंत जातात. ती स्फुंदत असते, इतक्यांत बाहेर पोस्टमन '' मी. पांढरपेशे '' अशी हांक मारतो. ती बाहेर जाऊन पत्र आणते व वाचूं लागते. वाचतां वाचतां तिची मुद्रा आनंदी बनते. )

**लिली** : ( आनंदानें स्वतःशींच ) माझा अरुदादा येणार ! माझा अरुदादा येणार ! ! ( हांक मारते ) भावड्या—अरे ए भावड्या—अरे लवकर इकडे ये—( नरेन हातांत वही घेऊन माडीवरून प्रवेशतो. त्यानें फुल अंडरवेअर व शर्ट परिधान केलेला असतो. नरेन—आबासाहेबांचा मानलेला मुलगा-वय २२ वर्षे—स्वभाव प्रेमळ—भावनाप्रधान तरुण असतो. )

**नरेन** : काय ग, कोकलायला काय झालंय ? घरांत उंदीर अडकला आहे कीं काय ?

**लिली** : ( चिडून ) हो हो उंदीर अडकला आहे. ( पत्र पाठीमागें लपवते. )

**नरेन** : तर मग त्याला काढायला चिमटा घेऊन येतों— ( जाऊं लागतो. )

**लिली** : कांहीं नको चिमटा आणायला, अगोदर इकडे ये पाहूं.

**नरेन** : कशाला ?

**लिली :** हें पहा, तुला आतां मी एक आनंदाची बातमी सांगणार आहें. काय बक्षीस देशील मला ?

**नरेन :** उजव्या गालावर तापलेल्या सळईचा एक सणसणीत डाग देईन ! पाहिजे असल्यास डाव्या गालावर टेकीन !!

**लिली :** ( बेछुटपणें ) अरे जा जा.

**नरेन :** काय म्हणालीस ? ( तिचें नाक पकडतो. )

**लिली :** ( रडकुंडीला येऊन ) पहा हं भावड्या ! ( ओरडते ) आबा साहेSSSब आबासाहेSSSब !

**नरेन :** बकरीसारखं बॅं बॅं काय करतेस ?

**लिली :** अगोदर माझं नाक सोडतोस कीं नाहीं ?

**नरेन :** अं हं, अगोदर हातांतलं पत्र दे—

**लिली :** नाहीं देत जा ! काय करशील रे ?

**नरेन :** काय करीन ?—( नाक जोरांत दाबतो. ती " मेलें मेलें " ओरडते. तो तिच्या हातांतलें पत्र घेऊन वाचूं लागतो, ती त्याच्यावर रागावून एका बाजूला नाक चोळीत उभी रहाते. पत्र वाचून तो हंसतो ) आज अरु-दादा येणार हीच बातमी तूं मला सांगणार होतीस ना ? ती तर मला कळून चुकली. बरं झालं नाहीं ? नाहींतर तूं सांगितली असतीस, तर बक्षीस म्हणून तुझ्या गालावर मला तापलेल्या सळईचा डाग द्यावा लागला असता. (हंसतो) अग न बोलायला काय झालंय ? मला वाटतं एस्. टी. च्या गाडीला हॅन्डल द्यायला पाहिजे-( तिचा कान पिरगाळतो. )

**लिली :** भावड्या—अग आई SS ग SSS ( रडते ).

**नरेन :** ( तिला चिडवून ) आहे कीं नाहीं गंमत ? चावी दिल्या-बरोबर एका क्षणांत ग्रामोफोनवर रेकॉर्ड चालूं झाली. ( हंसतो )

**लिली :** हो हो रेकॉर्ड चालूं झाली ! थांब, आबासाहेबांना तुझं नांव सांगतें.

**नरेन :** अग पण अशी चिडतेस काय ?

**लिली :** ( रडव्या स्वरांत ) माझा कान दुखला नाहीं वाटतं !

**नरेन** : खरंच ? अरेरे फार वाईट झालं. च्च्च्च्! आपण ' जंतर मंतर' करून बरा करूं हं—– ( जादुगाराचा आविर्भाव करीत ) ए कालीया मसान आगीया बेताल, त्रितालमेंसे झपतालमें आजाव और हमोरे लिली बेहेनका कान जल्दी अच्छा करो ! (तिच्या कानावर फुंकर मारतो. दोघे हंसतात.)

**लिली** : काय रे, मघांपासून कुठं गेला होतास ?

**नरेन** : अग माडीवर नाटक लिहीत बसलों होतों. हें पहा ताजं लिखाण ( वही उघडून दाखवतो. )

**लिली** : ( थट्टेनें ) कुणाला थापा मारतोस ? मघां त्या तिंबूनानांच्या चंपीच्या मागून जातांना पाहिलं मी तुला.

**नरेन** : मी कांहीं तिच्या मागून जात नव्हतों. उलट ती चकणीच माझ्या पुढं पुढं चालत होती.

**लिली** : ( मिस्किलपणें ) भावड्या, खरंच का रे तुला पसंत आहे ती ?

**नरेन** : चल हट ! त्या चकण्या पोरीशीं मी लग्न करतों आहें ! एकवेळ पांढऱ्या कपाळाच्या विधवेशीं मी लग्न करीन—पण प्राण गेला तरी तिंबूनानांच्या चंपीसारख्या कोळशाच्या खाणीचा मालक होणार नाहीं.

**लिली** : पण काय झालं तिच्याशीं लग्न करून, तिचा उद्धार केलास तर ?

**नरेन** : चांगलंच सांगते आहेस. तो डालडाचा डब्बा गळ्यांत बांधून फिरायला, थोडाच मी बॅन्डपथकामधला ड्रमवाला आहें ?

**लिली** : तर मग असं कर ! एखाद्या नाटकांतल्या नटीशीं लग्न कर, म्हणजे तुझ्या नाटकांत तुला भाडोत्री नटी आणायला नको.

**नरेन** : छान ! म्हणजे आबासाहेबांचें टेम्परेचर वाढायला सबळ कारण मिळायचं ( दोघ एकदम हंसतात ) बरं मी माझ्या कामाला जातों. माझ्या नाटकाचा अर्धा अंक जवळ जवळ लिहून पुरा झाला आहे. एका अनाथ विधवेची कटु कहाणी मी रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे ! ( बेहोष होऊन ) असं कथानक लिहिलं आहे—असं कथानक लिहिलं आहे कीं ज्याचं नांव तें—

( हातवारे करतो. तिच्या हाताला हात लागतो ) अं अं, माफ कर हं. मी मूडमध्यें आलों कीं माझं हें असं होतं !

**लिली** : नशीब माझं कीं जेवतांना हात तोंडांत जाण्याऐवजीं नाकांत जात नाहीं. ( हंसते )

**नरेन** : ( भावनेच्या वेगांत ) हंसू नकोस लिली ! पण माझं असं कां होतं ? मी नाटककार कसा झालों ? माझ्यांत नाटककाराचा आत्मा कसा निर्माण झाला ? माझं मलाच कळत नाहीं. मी एक अनाथ मुलगा आहें ! आबासाहेबांनीं मला लहानाचं मोठं केलं—शिक्षण दिलं—पण...पण मी कुठून आलों ? माझं जन्मस्थान कोणतं ? माझं मलाच कळत नाहीं.

**लिली** : भावड्या, एकाएकीं काय झालंय तुला ?

**नरेन** : अशीच एकाएकीं माझ्या डोक्यांत विचारांची वावटळ उठते आणि विचारांचं द्वंद्व युद्ध माझ्या डोक्यांत चालू होतं. माझं एक मन मला विचारतं " नरेन, तुझा जन्म कुठल्या कुळांत झाला आहे ? तुझे आई बाप कुठें आहेत ? बोल नरेन, असा स्तब्ध कां झालास ? " आणि मग मी निःस्तब्ध बनतों. वीज कोसळून एखाद्या वृक्षाची राख व्हावी, त्याप्रमाणें माझ्या हृदयाची जळून राख होते. तरी देखील पाहिल्या मनाच्या प्रश्नाला उत्तर देण्यासाठीं, माझं दुसरं मन धडपड करीत असतं—पण त्याला आशेचा प्रकाश दिसण्याऐवजीं, निराशेच्या काळ्याकुट्ट अंधःकारांत वावरावं लागतं—आणि मग मलाहि पटूं लागतं, कीं माझ्या जीवनांत काळाकुट्ट अंधार... अंधार पसरला आहे !

**लिली** : ( रडव्या स्वरांत ) भावड्या—असं रे काय करतोस ?

**नरेन** : ( रुद्ध स्वरांत ) मग काय करूं लिले ? कुणाचा मी खरा वारसदार आहें ? कुठं आहेत माझे आईबाप ? ( दुःखानें ) तुला ठाऊक आहे लिले, कांहीं लोक माझ्याविषयीं मी पापाचा गोळा असल्याबद्दल चर्चा करतात. कुणीं म्हणतात कीं मी गटारांतून वहात जात असतांना, मला बाहेर काढून आबासाहेबांनीं माझ्या पालनपोषणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आहे. कुणीं म्हणतात, कीं मी म्हणजे उकिरड्यावर सांपडलेलं बेवारशी

पोर आहें ! कुणाचं खरं मानायचं ?—कुणाचं ऐकायचं ? सांग—सांग लिली, कीं जन्म देणाऱ्या विधात्यानं आकाशांतून मला धरणीवर लोटून दिलं आहे ?

**लिली :** काय वेड पांघरून घेतलं आहेस तूं हें ? आम्हीं तुला परका मानला आहे कां ? माझ्याप्रमाणें अरुदादाचं देखील तुझ्यावर गाढ प्रेम आहे ! तुम्हीं दोघं हंसत खेळत असतांना आई नेहमीं म्हणायची अगदीं राम लक्ष्मणाची जोडी जमली आहे. अरुदादापेक्षां तुझ्यावरच तिचं अधिक प्रेम होतं. म्हणूनच मरतेसमयीं तिनं तुम्हां दोघांना जवळ घेऊन बजावलं होतं कीं, दोघेहि असेंच राम लक्ष्मणाप्रमाणें एकमेकांवर प्रेम करीत रहा.

**नरेन :** सारं कांहीं आठवतं आहे मला. गतजीवनाचा चित्रपट माझ्या नजरेसमोर राहिला कीं मला माझ्या मानलेल्या आईची आठवण येते. तिला कडकडून मिठी मारण्यासाठीं माझं मन अधीर होतं. ( चिडून ) आणि त्याच वेळीं मी कल्पनेनं चितारलेली—मला जन्म देणाऱ्या माझ्या आईची अक्राळ-विक्राळ मूर्ति माझ्या नजरेसमोर उभी रहाते. त्या चांडाळणीच्या नरडीचा घोट घेण्यासाठीं माझ्या हाताच्या मुठी आवळल्या जातात.

**लिली :** शांत हो भावड्या—शांत हो म्हणतें ना ?

**नरेन :** कसा शांत होऊं ? तूंच सांग लिली ! ( त्वेषानें ). 'मातेचं हृदय अपत्य प्रेमानं वितळतं ' असं कुठल्यातरी नाटकांत वाचलं आहे मी—पण तें झूट आहे—सारा फसवाफसवीचा बाजार आहे ! ! ( चरफडून ) मला गटारांत सोडून देतांना माझ्या आईचं मातृहृदय कुठं गेलं होतं ?—कुठल्या झाडाच्या फांदीवर कापून ठेवलं होतं ? आणि तें जर मला कळलं, तर त्या हृदयाचे तुकडे तुकडे करून, लूत लागलेल्या कुत्र्याला खायला घालीन ! !

**लिली :** भावड्या, असल्या भयंकर विचारांना मनांत थारा देऊं नकोस. मीं, तूं, अरुदादा सारींजण समदुःखी आहोंत.

**नरेन :** पण माझं दुःख वेगळं आहे. तुमच्या व माझ्या दुःखांत जमीन अस्मानाएवढें अंतर आहे. मी म्हणजे नुसताच अनाथ नसून, ज्याच्या आई-बापाचा पत्ता नाहीं असा एक पापाचा गोळा आहें ! मीं......पापाचा गोळा आहें ( रडतो ).

**लिली :** असं भलतंच कांहींतरी बोलूं नकोस भावड्या ! थोडं माझं ऐकशील का ?

**नरेन :** ( उदासतेनें ) दुसऱ्याकडून ऐकण्यासारखं कांहीं शिल्लक राहिलं नाहीं लिली ! ( उसळून ) खरं म्हणजे मला जन्माला घालणाऱ्या चांडाळणीचा प्राण घेतल्याखेरीज, माझ्या आत्म्याची तृप्ति होणार नाहीं ! तिचा शोध करून मी तिला ह्या अफाट जगांतून शोधून काढीन—आणि ती जर जिवंत नसेल, तर ज्या स्मशानभूमींत तिचा दफनविधी पार पाडला असेल त्या स्मशानांतील राखेंत तोंड खुपसून तिला जाब विचारीन; कीं चांडाळणी कशाला मला जन्म दिलास ?... कशाला मला जन्म दिलास ? ( ढळढळां रडतो ).

**लिली :** ( स्फुंदत ) असं काय करायचं भावड्या ?—शांत राहा म्हणतें ना ?

**नरेन :** माझ्यांतील सहनशीलतेचा प्रवाह आटला आहे. जीवनांतील अंधःकारांत ठेचाळतों आहें मी ... रक्तबंबाळ होतों आहें ! कोण बांधूं शकेल माझ्या हृदयावरील जखमा ? आहे का कुणीं ? नाहीं—नाहीं माझा वाली कुणींच नाहीं !

**लिली :** मी—मी तुझी वाली आहे ! तुझी लिली—तुझी मानलेली बहीण, तुझ्यासाठीं आपले पंचप्राण पणास लावण्यास तयार आहे !!

**नरेन :** ( आवेगानें ) लिली—

**लिली :** भावड्या—( प्रेमभरानें एकमेकांस मिठी मारतात. क्षणभर त्याच अवस्थेंत असतात. त्याचवेळीं आबासाहेब आंतून कपडे करून प्रवेशतात व तें दृश्य पाहातात आणि संतप्त होतात. )

**आबा :** लिली—नऱ्या—कार्ट्यांनों, काय चालवलं आहांत तुम्हीं हें ? भर दिवसाढवळ्या खुशाल एकमेकांना मिठ्या मारताहांत—वाहवारे बहीण-भावाचं नातं !

**लिली :**<br>**नरेन :** ( असहाय्यतेनं ) आबासाहेब—

**आबा :** हं रंगाचा बेरंग झाला असेल नाहीं तुमच्या ? दुधांत मिठाचा खडा पडल्याप्रमाणें वाटलं असेल तुम्हांला ! बेशरम कार्ट्यांनों, अगदींच कसं ताळतंत्र सोडलंत ?

**लिली** : ( विनवून ) आबासाहेब, स्वतःचा गैरसमज करून डोक्यांत राख घालून घेऊं नका. सारं कांहीं मी तुम्हांला समजावून सांगतें.

**नरेन** : ( समजावणीच्या स्वरांत ) होय आबासाहेब, जरा शांत चित्तानं सारं कांहीं ऐकून घ्या.

**आबा** : माझं चित्त शांत आहे. तुम्हां दोघांप्रमाणें त्याच्यांत चलबिचल सुरू झालेली नाहीं.

**लिली** : पण आबासाहेब–

**आबा** : चूप ! एक शब्द उच्चारूं नकोस. चल निघ–चालती हो इथून–( ती आंत जाते ) नऱ्या, खाल्लेल्या घराचे वासे मोजतांना तुला शरम वाटायला पाहिजे ! तुला लहानाचा मोठा केला, शिक्षण दिलं, चांगलेच माझे उपकार फेडतो आहेस !

**नरेन** : ज्याच्या अंगाखांद्यावर मी खेळलों, बागडलों, लहानाचा मोठा झालों, स्वतःच्या पोटच्या गोळ्याप्रमाणें ज्यांनीं माझं पालनपोषण केलं, त्या तुमच्या मुलीबरोबर प्रेमाचे लपंडाव खेळून तुमच्याबरोबर सासऱ्या–जावयाचं नातं जोडण्याची नीच कल्पना, कधींहि माझ्या मनाला शिवलेली नाहीं. लिली माझी बहीण आहे आणि ती माझी बहीणच राहील ! !

**आबा** : तुम्हां तरुणांच्या तोंडून निघणारे शब्द, म्हणजे पाण्यांतून बाहेर पडणारे पण पाण्याच्याच पृष्ठभागावर फुटणारे बुडबुडे असतात; त्या शब्दांवर विश्वास ठेवून, मला माझ्या प्रतिष्ठित घराण्याची कांच फोडून घ्यायची नाहीं.

**नरेन** : ( हताशतेनें ) माझ्याकडे व लिलीकडे पाहाण्याचा तुमचा दृष्टीकोन वेगळा आहे. तुमच्या पहाण्यांत जो अविचाराचा पडदा आहे, तो दूर करा आबासाहेब ! म्हणजे आमच्या बंधुभगिनी प्रेमाच्या नाटकांतील चालू असलेले उदात्त प्रेमाचे प्रवेश, तुम्ही अगदीं न्याहाळून पाहूं शकाल !

**आबा** : ( चिडून ) नाहीं नाहीं-म्हणजे आतां मी जें पाहिलं आहे तें स्वप्न आहे ! म्हणजे पाहाणाराच मी मूर्ख आहें !!

**नरेन** : आतां कसं पटवून देऊं तुम्हांला आबासाहेब ?

**आबा :** मला सारं कांहीं पटलं आहे. मी तुझा बाप आहें. लिली तुझी बहीण आहे, हें जर तुला पटलं असतं तर लिलीला बाहुपाशांत कवटाळतांना, तुला बाह्य जगाचा विसर पडला नसता !

**नरेन :** ( ओरडतो ) आबासाहेब, तुमच्या तोंडचे जहरी शब्द ऐकून माझ्या सर्वांगाला आग लागली आहे ! पाहा, पाहा माझं सारं शरीर कंपायमान होऊं लागलं आहे. ( एकदम वाईट वाटून ) पण मी तुमचं कांहींच करूं शकत नाहीं; कारण मी म्हणजे एक पापाचा निर्जीव गोळा आहें ! कुणींहि मला तुडवावं—कुणींहि माझ्या काळजाचे लचके तोडावे—मी म्हणजे उकीरड्यावर भुंकणारा बेवारशी कुत्रा आहें !!

**आबा :** कुत्र्याची जात देखील इमानी असते ! आणि तेवढा इमानीपणा तुझ्यांत असता, तर लिलीबरोबर नीचकर्म करण्याची दुर्बुद्धि तुला झालीच नसती.

**नरेन :** तुमच्यापुढें शर्त झाली आबासाहेब ! ह्या क्षणाला लिलीच्या व माझ्यांत असलेल्या उदात्त प्रेमाची सत्यता तुम्हांला पटवून देण्यासाठीं, आम्हां दोघांचीं हृदयं जरी कापून तुमच्या पुढ्यांत ठेवलीं, तरी तुमच्या मनाची समजूत पटणं शक्य नाही !

**आबा :** ( उपहासानें ) हं, हृदयं जरी कापून ठेवलींत, तरी तारुण्याच्या उन्मादानं मलीन झालेल्या तुमच्या प्रेमाचा प्रवाह, थोडाच थांबू शकणार आहे ? लेकाचा मलाच तत्त्वज्ञानाच्या गोष्टी शिकवतो आहे. फुकटचं खाऊन बरीच चरबी चढलेली दिसते आहे तुला !

**नरेन :** फुकटचं खाण्याची मला मुळींच आवड नाहीं. तुम्हीच मला फुकटचं खायला शिकवलं आहांत. तुम्हीं दिलेल्या अपुऱ्या शिक्षणामुळें, तुमच्या प्रतिष्ठेला शोभेल अशी नोकरी मला मिळत नाहीं. मोलमजुरी करीन म्हटलं तर तुमची प्रतिष्ठा आडवी येते—त्याला मी तरी काय करूं ?

**आबा :** अस्सं ! शिंगं फुटल्यावर तीं उगारायला बैलाला शिकवावं लागत नाहीं !

**नरेन :** म्हणून म्हणतों आबासाहेब, माझा मार्ग मला मोकळा करून द्या—उपकार होतील तुमचे माझ्यावर ! पण तुम्हांला एक कळकळीची

विनंति करतों कीं तुम्ही माझ्या व लिलीबद्दल जो मनामध्यें दुराग्रह केला आहे तो मनांतून काढून टाका. ( त्राग्यानें ) नाहींपेक्षां ज्या हातांनीं तुम्हीं मला खेळवलंत...गोंजरलंत त्याच हातानीं तापलेली सळई घेऊन माझे दोन्ही डोळे फोडून टाका—म्हणजे तुमच्या करारी नजरेला भिडणारी माझी वासनामय नजर, लिलीकडे कधींहि वळणार नाहीं ! !

**आबा** : पुरे झाला तुझा शहाणपणा ! ह्यापुढं एक शब्द उच्चारशील तर थोबाड रंगवून काढीन ! ( हांक मारतो ) लिली—अग ए लिली—

( " आलें हं " असें म्हणत लिली आंतून प्रवेशते )

**लिली** : काय म्हणतां आबासाहेब ?

**आबा** : मी दत्तोपंतांकडे जाऊन थोड्याच वेळांत परत येतों. तेवढ्यांत जर कुणीं मला भेटायला आलं तर त्याला इथंच थांबायला सांग. लवकरच येतों मी—( बाहेर जातो. )

**लिली** : ( कारुण्यपूर्ण हांक मारते ) भावड्या—बोलत नाहीं ना माझ्याशीं ?

**नरेन** : ( स्वतःवर चिडून ) भावड्या म्हणून हांक मारूं नकोस मला ! तुझा भावड्या मेला—केव्हांच स्वर्गवासी झाला आहे. आतां तुझ्या पुढ्यांत जो बोलतो आहे तो तुझा भावड्या नसून तुझ्या भावड्याचं चालतं बोलतं भूत आहे ! !

**लिली** : ( कळवळून ) भावड्या, नको रे माझ्या दुःखावर डागण्या देऊंस—( त्याच्या खांद्यावर हात ठेवते. तो झिडकारतो ).

**नरेन** : ( रागानें ) स्पर्श करूं नकोस माझ्या अंगाला ! दूर हो माझ्यापासून ! ( भेसूरतेनें ) नाहींतर हें पिशाच्च तुझ्याकडे प्रेमाची मागणी करील... तुझ्या गळ्यांत सक्तीनं माळ घालून, तुला सहधर्मचारिणी बनवील ! ! आणि मग मध्येंच हें पिशाच्च अदृश्य होईल ! पुन्हां तुझी व त्याची भेट कधींहि होणार नाहीं ! ! ( आवेगानें ) आपल्या कुंकवाचा धनी गेला, म्हणून तुला तुझ्या कपाळींचं कुंकू पुसावं लागेल ! तुझं कपाळ स्फटिकाप्रमाणें पांढरं फटफटीत होईल ! ! तूं विधवा होशील—तूं विधवा होशील ! ! !

**लिली** : असं काय बोलतोस भावड्या ? ( हुंदका देते )

**नरेन** : ( भ्रमिष्टाप्रमाणें ) कांहीं नाहीं लिली......माझ्या नाटकाचा अर्धा अंक इथंच संपला आहे ...... इथंच संपला आहे–( आवेगानें आंत जातो. )

**लिली** : भावड्या- भावड्या–( हताशतेनें गाणें म्हणते )

जाऊं नको मम हृदयवीणा छेडूनी
बंधुत्त्वाचें नातें तोडूनी
हृदयवीणेच्या तुटतील तारा
बदसूर येतील ऐकायाला
क्षणांत वादळी वारा सुटुनी
जीवन संगीत जाईल संपुनी
विनवितें तुज मी भगिनी

[ गाणें संपल्यावर लिली आतां जाऊं लागते–इतक्यांत बाहेरून बीनासह अरविंद प्रवेशून तिला हांक मारतो. अरविंद–वय सत्तावीस–आबासाहेबांचा मुलगा – स्वभाव खेळकर–प्रेमळ. बीना–तरुण विधवा–वय एकवीस स्वभाव–गोड तसाच मनामिळाबू. तिनें धवलवस्त्रें परिधान केलेलीं असतात. अरविंदाच्या हातांत हॅन्ड बॅग असते. )

**अरविंद** : लिली—

**लिली** : अरुदादा–( त्याच्याजवळ जाते ).

**अरविंद** : चार वर्षांत किती मोठी झालीस ग तूं ! त्यावेळीं परकर नेसायचीस आणि आतां—

**लिली** : पातळांत एन्ट्री केली आहे असंच ना ?– सर्वजण हंसतात ) आणि ह्या रे कोण बरोबर आणल्या आहेस ?

**अरविंद** : सारं कांहीं सांगतों तुला. हो, पण आबासाहेब कुठं आहेत ? आणि आपला नरेन काय करतो आहे ?

**लिली** : थांब हं बोलावतें त्याला ! भावड्या–अरे ए भावड्या–( हांक मारीत आंत जाते ).

**अरविंद** : ( बीनाला ) अरेच्या, तू इथं आहेस हें मी विसरूनच गेलों.

**बीना** : अजून कशांत कांहीं नाहीं आणि एवढ्यांतच माझा विसर पडला ना ?

**अरविंद** : बीना, माझ्या हृदय-मंदिरांत तुझी दिव्य मूर्ति बसवलेली असतांना, तिचा खराखुरा विसर पडणं शक्य तरी आहे का ?

**बीना** : अरविंद, किती भावनाशील अहांत हो तुम्हीं ! ( इतक्यांत लिली नरेनला ओढीत आंतून प्रवेशते ).

**लिली** : असा पुढं ये ना ! हा अरुदादा नाहीं तर कोण तुझा काकोबा ?

**नरेन** : ( आनंदातिशयानें ) अरुदादा !

**अरविंद** : नरेन ! ( दोघं भेटतात ) ठीक चाललं आहे ना नरेन ?

**नरेन** : सर्व कांहीं ठीक चाललं आहे. हो, पण ह्या कोण पाहुण्या ?

**अरविंद** : अरे हो, हिची ओळख करून द्यायची राहिलीच. ही माझी मैत्रीण बीना ! आमच्याच शाळेमध्यें ड्रॉईंग टीचर आहे. आणि बीना, हा माझा भाऊ–मास्टर नरेन–उत्कृष्टपैकीं नाटककार आहे.

**बीना** : नमस्ते !

**नरेन** : नमस्ते !!

**अरविंद** : आतां कुठलं नाटक लिहायला घेतलं आहेस रे ?

**नरेन** : " सौभाग्य ! "

**बीना** : ( एकदम उद्गारते ) सौभाग्य —

**नरेन** : होय–सौभाग्य हेंच माझ्या आगामी नाटकाचं नांव आहे.

**अरविंद** : आणि बीना, ही माझी छोटी बहीण लिली—

**नरेन** : ( मध्येंच ) लवंगी फटाकडी !

**लिली** : आणि हा अॅटम बॉम्ब !!

**नरेन** : ( वेडावतो ) हॅं हॅं हॅं हॅं ! ( तिला चिमटा काढतो )

**लिली** : अरुदादा, भावड्या पाहा ना कसा चिवडतो तो !

**नरेन** : हो, पण हिनं नाहीं का मला चिडवलं ? मी लवंगी फटाकडी बोलल्याबरोबर हिनं अॅटम बॉम्बचा स्फोट केला.

**अरविंद** : छान. म्हणजे अजूनही दोघंजण भांडत असता तर !

**लिली** : तूं आला आहेस–आतां नाहीं आम्ही भांडणार ! बीनाताई, तुम्ही अशा स्तब्ध कां ? बोलत कां नाहीं ?

**बीना** : तसं कांहीं नाहीं. कित्येक दिवसांनीं तुम्ही बहीणभाऊ एका ठिकाणीं भेटले आहांत–तेव्हां मी बोलण्यानं तुमच्या बोलण्यांत व्यत्यय नाहीं का येणार ?

**लिली** : आमचं हें नेहमीं असंच चालतं. आज चार वर्षांनीं अरुदादा व आमची भेट झाली आहे. किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं तुम्हांला ! आज आमची आई असती तर—

**नरेन** :<br>**अरविंद** : } लिली—

**बीना** : लिलीताई, तुमच्या घराण्याचा सारा इतिहास, मला अरविंदानीं समजावून सांगितला आहे.

**नरेन** : ( विषय बदलून ) अरे अरुदादा, आज एवढ्या वर्षांनीं तूं आला आहेस, पण लिली व माझ्यासाठीं कांहीं खायला आणलंस कीं नाहीं ?

**अरविंद** : हो ना. बोलण्याच्या गडबडींत द्यायला विसरलोंच. ( बॅगेंतून सफरचंद काढून देतो ) म्हटलं लिलीताई, हा घ्या आपला आवडता खाऊ– ( ती घेते ) समजलं का बीना, लहानपणापासून सफरचंद खाण्याची हिला फार आवड आहे.

**नरेन** : म्हणून तर सफरचंदासारखी लाललालबुंद झाली आहे ! पण स्वभावांतला मिरचीचा तिखटपणा कांहीं अजून गेला नाहीं. ( अरविंद व नरेन हंसतात )

**बीना** : नरेनभाऊ, कां बरं एकसारखं चिडवताहांत त्यांना ?

**लिली** : तुम्हांला ठाऊक नाहीं बीनाबाई, एकदां का ही रामलक्ष्मणाची जोडी जमली कीं मला अगदीं हैराण करून सोडते.

**अरविंद** : आणखी आतां रामलक्ष्मणाच्या जोडीला सीतामाई आणली आहे !

**लिली** : कुठं आहे ती ?

**अरविंद** : जिच्याजवळ तूं बोलते आहेस–तीच तुझी सीतामाई आहे लिली.

**लिली** : ( आश्चर्यानें ) म्हणजे ?

**बीना** : ( असहाय्यतेनें ) अरविंद--

**अरविंद** : बीना, आपल्या प्रेमरहस्याचा स्फोट केलाच पाहिजे. लिली, नरेन, बीनाबरोबर लग्न करण्याचा मी दृढनिश्चय केला आहे.

**नरेन** : अरुदादा, एक शंका विचारली तर राग नाहीं ना येणार ?

**अरविंद** : मी जिच्याबरोबर लग्नगांठ बांधण्याचा दृढनिश्चय केला आहे, तिच्या कपाळीं कुंकू दिसत नाहीं, हें पाहून तुझ्या मनांत शंकाकुशंकांचें काहूर माजलं आहे ना ?

**नरेन** : होय अरुदादा !

**अरविंद** : तिच्या दुर्दैवानं तो कुंकुमतिलक केव्हांच पुसून टाकला आहे. लग्न झाल्यानंतर अवघ्या दोन महिन्यांत, तिच्यावर आकाशीची कुऱ्हाड कोसळली असल्यामुळें एक तरुण सधवा क्षणांत विधवा झाली आहे !

**बीना** : ( असहाय्यतेनें ) अरविंद—

**अरविंद** : ( भारावलेल्या अंतःकरणानें ) तेव्हां तूंच सांग नरेन, अशा तरुण विधवेचं जिवन सुखकर करण्याचा मी प्रयत्न केला तर तो चुकीचा ठरले का ? बोल बोल लक्ष्मणा, तुझा राम तुला विचारतो आहे, कीं पसंत आहे ना तुला ही सीतामाई ?

**नरेन** : अरुदादा, तुझ्या पसंतीच्या आड मी व लिली कधींच येणार नाहीं. पण आपले आबासाहेब ...

**लिली** : होय अरुदादा. आबासाहेबांची समजूत कशी घालायची ?

**अरविंद** : मी घालतों आबासाहेबांची समजूत–तुम्हीं त्याची काळजी करूं नका.

**लिली** : एवढी तयारी आहे ना ?–तर मग मला वाहिनी पसंत आहे ! भावड्या, तुझं काय मत आहे ?

**नरेन** : माझं काय मत असणार ? ह्या दोघांच्या लग्नाप्रीत्यर्थ लवकर पार्टी झोडण्याचा माझा विचार आहे ! ( बीनाखेरीज सर्व हंसतात. बीना लाजते ).

**लिली :** ( थट्टेनें बीनाला ) काय हो ड्रॉईंग टीचर, मुलांना कागदावर चित्र रेखाटायला शिकवतां शिकवतां, स्वतःच्या हृदयाच्या कागदावर तुम्ही आमच्या अरुदादाचं चित्र, आमच्या परवानगीशिवाय रेखाटलंत ना ? ( सर्व हंसतात. बीना लाजते. )

**नरेन :** बरं लिली, तूं दोघांसाठीं चहा ठेव ! अरुदादा, तूं व बीनाताई चहा होईपर्यंत गप्पा मारीत बसा—मी माझ्या कामाला जातों—( जाऊं लागतो. )

**लिली :** अरे थांब. मी पण येतें तुझ्याबरोबर !

**नरेन :** कृपा करून तूं माझ्याबरोबर येऊं नकोस. डोकेंदुखीची साडेसाती बरोबर घेऊन जायला कुणाला एवढी हौस आली आहे ?

**लिली :** मी डोकेंदुखीची साडेसाती नाहीं, तर डोकेंदुखी थांबवणारी अॅस्प्रोची गोळी आहें !

**नरेन :** पण ती गोळी फक्त राजनच्या डोकेंदुखीला लागूं पडते—आमच्या नाहीं.

**बीना :** डोकेंदुखी ? राजन ? अॅस्प्रोची गोळी ? ही काय भानगड आहे ?

**अरविंद :** ऐकूं द्या तरी आम्हांला !

**नरेन :** अरे ह्या अॅस्प्रोच्या गोळीनं त्या राजनबरोबर आपल्या प्रेमाची जोडगोळी जमवली आहे—( सर्व हंसतात. लिली चिडते )

**लिली :** पहा हं भावड्या— नरेनच्या पाठींत चापट मारते )

**अरविंद :** अरे, पण हा कुठला राजन् ?

**नरेन :** राजन् नव्हे तर ह्या सजणीचा साजन आहे तो ! त्या दामुअण्णा नाक उडव्यांचा कधींहि नाक न उडविणारा ज्येष्ठ चिरंजीव !

**अरविंद :** हं हं म्हणजे तो उडाणटप्पू राज ?

**बीना :** ( स्वतःशींच ) राज !

**नरेन :** होय, होय, तोच तो ! हिच्या प्रेम-नाटकाचा हिरो व माझ्या नाटकाचा कॉमेडीअन !! ( सर्व हंसतात. हंसतां हंसतां नरेन माडीवर जातो. लिली देखील चिडून त्याच्या पाठोपाठ घरांत जाते. त्याचवेळीं आबासाहेब बाहेरून प्रवेशतात.)

**आबा :** कोण—अरविंद ? चार वर्षांपूर्वीं मोठ्या फुशारकीनं प्रतिज्ञा करून गेला होतास, कीं तुमच्या घरांत यापुढं कधींहि पाऊल ठेवणार नाहीं ! तर मग पुन्हां कां इथं आला आहेस ?

**अरविंद :** अज्ञानाच्या अंधःकारांत वावरत असतांना, माझ्या हातून ती एक चूक घडली होती–त्याबद्दल मला क्षमा करा आबासाहेब ! मी आरंभलेल्या माझ्या शुभकार्यास आपला शुभाशीर्वाद मिळेल, अशी आशा उराशीं बाळगून मी पुन्हां इथं आलों आहें.

**आबा :** तुझ्या शुभकार्यास आशीर्वाद द्यायला, मी कांहीं गळ्यांत जपमाळा घालून फिरणारा साधुपुरुष नाहीं ! आणि ही कोण बरोबर घेऊन आला आहेस ?

**अरविंद :** बीना हिचं नांव ! मी ज्या शाळेंत शिक्षक आहें–त्याच शाळेंत ही ड्रॉईंग टीचर आहे. बीना, हे माझे वडील–आबासाहेब ! सामाजिक कार्यांत मोठ्या उत्साहानं भाग घेत असतात. थोडक्यांत सांगायचं म्हणजे कट्टे समाज–सुधारक आहेत.

**बीना :** नमस्ते !

**आबा :** ( चिडून ) नमस्ते–आणि काय ग, तुझ्या कपाळीं कुंकू दिसत नाहीं तें ? कुंकू न लावण्याची फॅशन केव्हांपासून अंमलांत आणली आहेस ? हिंदु आहेस कीं दुसराच कुठला तरी धर्म आहे तुझा ?

**अरविंद :** धर्मानं हिंदू असून आपल्याच जातीची आहे ही ! तिच्या दुर्दैवानं अल्प काळांतच तिला वैधव्याच्या खाईत लोटलं आहे. आईबापांचा आधार नसलेली–निराधार अशी एक तरुण विधवा आहे ही ! !

**आबा :** आणि तिला मिरवीत तूं खुशाल आपल्या घरीं घेऊन आला आहेस ? हिला तुझ्याबरोबर स्वतःच्या घरीं आणतांना, समाज काय म्हणेल ? हा साधा विचार तुझ्या मनाला कसा शिवला नाहीं ?

**अरविंद :** तिच्या व माझ्या लग्नाचा विचार नक्की झाल्यावर, लोकांच्या कुचेष्टांचा व निर्भत्सनेचा विचार करायला मला सवडच सांपडली नाहीं.

**आबा :** ( क्रोधानें ) म्हणजे ? ह्या विधवेबरोबर तूं पुनर्विवाह करणार ? ह्या कलंकिनीच्या गळ्यांत माळ घालून, तिला आपली सहधर्मचारिणी बनवणार ?

**बीना :** ( असहाय्यतेनें ) अरविंद ! एक क्षण देखील इथं थांबूं नका. माझ्या कोमल हृदयीच्या भावनांचीं फुलं, आबासाहेबांच्या तोंडून निघणाऱ्या प्रखर बोलानं जळून जाताहेत — त्यांची राख होते आहे. चला अरविंद, माझ्या दुर्दैवाची कहाणी मला ऐकायची नाहीं. ( जाऊं लागते ).

**अरविंद** : थांब बीना—

**आबा** : कलंकिनी, माझ्या तोंडचे बोल जर तुझ्या कानांना कठोर वाटतात, तर माझ्या मुलाला प्रेमपाशांत पकडून, माझ्या प्रतिष्ठित घराण्यावर—माझ्या नांवलौकिकावर डांबर फासायला कां तयार झाली आहेस तूं ?

**अरविंद** : आबासाहेब, दोषाचं खापर तिच्या माथ्यावर फोडण्याऐवजीं माझ्या माथ्यावर फोडा.

**आबा** : अरे, आतां तुझ्यापुढं डोकं फोडायचं बाकी राहिलं आहे. एका विधवेबरोबर लग्न करण्याची तुला दुर्बुद्धि सुचावी ? माझ्या प्रतिष्ठित घराण्याची कांच, अशा तऱ्हेनें फोडण्याचा तुझा विचार होता, तर जन्मतांच मेला असतास तर माझ्या अब्रूचे धिंडवडे तरी निघाले नसते.

**बीना** : ( कळवळून ) आबासाहेब—आबासाहेब, नका हो—अरविंदांना असं टाकून बोलूं नका. अरविंद, माझ्या कपाळीं कुंकुमतिलक लावून घेण्याच्या अभिलाषानं, तुम्हांला घेऊन मी इथं आलें आहें—पण मृगजळाच्या मागं धावून फसवणुकीचं माप माझ्या पदरांत पडलं आहे.

**अरविंद** : बीना—तूं शांत राहा पाहूं ! आबासाहेब, बीनासारख्या एका निराधार तरुण विधवेशीं मी पुनर्विवाह करून तिच्या जीवनांत प्रकाश आणला, तर कोणतं पातक माझ्या हातून घडलं जाणार आहे ? आपण स्वतः समाज-सुधारणेचं व्रत स्वीकारलं आहांत—असं असतांना स्वतःच्या मुलाबरोबर एका निराधार तरुण विधवेचा पुनर्विवाह लावून, तिचं जीवन उज्ज्वल करणं ह्या मताशीं आपण सहमत कां होऊं नये ?

**आबा** : तुझ्या प्रश्नाचं उत्तर द्यायला, मी कांहीं सवाल जबाब हें सदर चालवणारा, एखाद्या फडतुस चित्रपट साप्ताहिकाचा फडतुस संपादक नाहीं. माझ्या शब्दाबाहेर जाऊन तुला ह्या कलंकिनीबरोबर पुनर्विवाह करायचा असेल, तर अगोदर माझ्या घराबाहेर हो ! चल नीघ—

**बीना** : चला अरविंद—चला म्हणतें ना ! आबासाहेबांचा अपमान करून तुम्ही जर माझ्या कपाळीं कुंकुमतिलक लावण्याचा प्रयत्न केलांत, तर त्यांच्या शापाग्नीनं आपल्या संसारसुखाची जळून राख झाल्याशिवाय राहाणार नाहीं ! म्हणून म्हणतें अरविंद, अगोदर घराबाहेर व्हा—नाहींपेक्षां मला तरी जायला

मोकळीक द्या. माझ्या दैवीं लिहिलेले भोग भोगण्यास मी समर्थ आहें. ह्या अभागिनीसाठीं—ह्या कलंकिनीसाठीं आपण आपल्या सर्वस्वाचा त्याग करायला तयार होऊं नका. जातें मी अरविंद—( बाहेर जाऊं लागते )

**अरविंद** : ( तिला अडवून ) थांब बीना !

**बीना** : नाहीं अरविंद ! सोडा मला—

**अरविंद** : ( रागावून ) थांब म्हणतों ना ?

**आबा** : नाटक—सारं नाटक आहे हें ! तिनं म्हणायचं जातें मी—त्यानं म्हणायचं थांब जरा. एका विधवेचं नाटक आहे हें !

**अरविंद** : ( आवेषानें ) होय, विधवेचंच नाटक आहे हें ! समाजाच्या बागुलबुवाला भिवून—त्याच्या आक्राळविक्राळ जबड्यांत भक्ष्य म्हणून पडलेल्या, एका तरुण विधवेला समाजाच्या अधोगतीपासून वांचविण्याचा प्रयत्न करणाऱ्या, एका तरुणाच्या धैर्याचं कथानक ह्या नाटकांत रंगवायचं आहे ! तरुण विधवेशीं पुनर्विवाह करून, काकदृष्टीनं तिच्याकडे पाहाणाऱ्या भोंदू समाजांतील सैतानांच्या नजरा, जादूची कांडी फिरल्याप्रमाणें कायमच्या बंद करून टाकायच्या आहेत ! !

**आबा** : ह्या साऱ्या गोष्टी तुला माझ्या घराबाहेर करतां येतील ! इथं नाहीं ! समजलं ?

**अरविंद** : ( कळकळीनें ) आबासाहेब, कसं पटवून देऊं तुम्हांला ? समाजाची नैतीक पातळी सुधारायची असेल, तर तरुण विधवांचे पुनर्विवाह व्हायला पाहिजेत ! नाहींतर वासना—विकाराच्या आगीनं होरपळून निघणाऱ्या तरुण विधवा, ती आग शांत करण्यासाठीं समाजांतील भोंदू लोकांच्या इच्छेला बळी पडल्याशिवाय राहाणार नाहींत !

**आबा** : ( अधिक चिडून ) हीं तुझी व्याख्यानबाजी मला ऐकवूं नकोस! नाक्यावर उभा राहून हमरस्त्यावर दवंडी पीट ! जा—चार लोक तरी तिथं जमा होतील ! चल नीघ—एकक्षण देखील माझ्या घरांत थांबूं नकोस !

**बीना** : अरविंद, आतां तरी शहाणे व्हा. स्वतःचा स्वाभिमान दुखवून घेण्याएवढे तुम्हीं दुबळे केव्हांपासून झालांत ? ज्या ठिकाणीं तुमच्या मनाचा भंग होतो आहे—अपमानाच्या कोठडींत तुमच्या निर्भीड मनाला डांबून ठेवलं जात

आहे, तिथं आपली ताठर मान कमानीप्रमाणें तुम्हीं कां वाकवीत अहांत, अरविंद ?

**अरविंद** : तूं अगोदर शांत राहा बीना ! आबासाहेब, थोडा मनाशी. विचार करा. बीनाच्या जागेवर तुमची मुलगी–लिली असती आणि तिच्यावर जर ऐन तारुण्यांत बीनाप्रमाणें वैधव्याचा डोंगर कोसळला असता, तर तिचे होणारे हाल–तारुण्य सुखासाठीं हपापलेल्या तिच्या मनाच्या यातना, तुम्हीं उघड्या डोळ्यानीं पाहिल्या असत्यात का ? तिच्या जीवनाची चांदरात फुलून ती सुखी व्हावी किंबहुना तिचा पुनर्विवाह करून, वैधव्याचा कलंक पुसून तिच्या कपाळीं सौभाग्यतिलक लावला जावा, असं तुमच्या मनाला वाटल्या-शिवाय राहिलं असतं का ? ( कळकळीनें ) आबासाहेब, बीना देखील तुमचीच मुलगी आहे असं समजून, तुम्ही आमच्या लग्नाला संमति द्या.

**आबा** : छान ! चांगलीच वाणी पाघळते आहे तुझी ! स्वतःच्या बहिणीबद्दल किळसवाणे उद्गार काढतांना, तुझी जीभ नागीणीसारखी कशी वळवळते आहे ? त्याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटतं आहे.

**अरविंद** : त्यांत आश्चर्य वाटण्यासारखं काय ? सतत पंधरा पंधरा, वीस वीस वर्षे, विषयसुखाचा आनंद मनमुराद लुटल्यानंतर देखील माणूस आपल्या भावनांवर बंधन घालूं शकत नाहीं, तिथें लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांत ज्या तरुण स्त्रीचा सौभाग्यतिलक काळानं हिरावून नेला आहे, त्या तरुण स्त्रीला आपल्या भावनांवर बंधन घालणं शक्य तरी आहे का ?

**आबा** : हें पाहा, ह्या तुझ्या प्रचारकी थाटाच्या बोलण्यानं, माझ्यावर यत्किंचितहि परिणाम होणार नाहीं ! माझ्या विचाराबाहेर गेलेली कोणतीहि गोष्ट मला पटणार नाहीं ! !

**बीना** : ऐका अरविंद ! कानाचे पडदे फाडून ऐका–आणि ज्या अपेक्षा तुम्ही आपल्या हृदयाच्या कांचपात्रांतून जपून आणल्या होत्यात, तें कांचपात्र फोडून टाका.

**अरविंद** : बीना, मी खंबीर असतांना तूं असा धीर सोडूं नकोस. आबासाहेब ह्यापुढें हा अरविंद तुमच्या मताबाहेर जाऊन, एखाद्या वृक्षाप्रमाणें

बीनाच्या जीवन वेलीला अंगाखांद्यावर खेळवीत राहील ! बीनाचा आश्रय-दाता म्हणून जगांत मानानं मिरवेल ! !

**आबा** : तर तर गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा साऱ्या नद्यांना आश्रय देणारा हिमालयपर्वतच लागून गेला आहेस ना तूं ! तूं चूप राहा. तुला काडीएवढी दखील अक्कल नाहीं. ( बजावून ) अऱ्या, आतां जास्त वेळ न लावतां मुकाट्यानं माझ्या घराची पायरी उतर ! समाज-सुधारणेचं बंड पुकारणारा बंडखोर माणूस तुला आज्ञा फर्मावतो आहे !

**अरविंद** : आणि त्याच बंडखोर बापाचा बंडखोर मुलगा तुम्हांला प्रतिज्ञा-पूर्वक सांगतो आहे कीं लग्न करीन तर बीनाबरोबर–एका तरुण विधवेबरोबर करीन–नाहींपेक्षां आजन्म अविवाहित राहीन ! ! थांबा–तुमच्या अध्यक्षतेखालींच बीनाचा सौभाग्य तिलकविधी मला पार पाडूं दे–(आवेगानें आंत जातो ).

**बीना** : अरविंद : ( भांबावते. आबासाहेब संतापानें फेऱ्या मारतात इतक्यांत अरविंद कुंकवाचा करंडा घेऊन आंतून प्रवेशतो. )

**आबा** : ( बजावून ) अऱ्या. नीट विचार कर !

**अरविंद** : धनुष्यांतून सुटलेला बाण व तोंडातून बाहेर पडलेला शब्द कधींहि मागं घेतां येत नाहीं ! ( त्याचवेळीं नरेन माडीवरून प्रवेशतो व त्याला प्रोत्साहन देतो. लिली आंतून दोन चहाचे कप घेऊन प्रवेशते ).

**नरेन** : बरोबर आहे अरुदादा ! अरे तूं खुशाल बीनाताईच्या कपाळीं कुंकू लाव !

**अरविंद** : असं असेल तर मग—( बीनाच्या कपाळीं कुंकू लावतो. )

**आबा** : ( संतापून ) अऱ्या–( काठी प्रहार करतात. नरेन मध्यें होऊन काठी प्रहार झेलतो.)

**नरेन** : (कळवळून) अग आई गऽऽऽ ( बेशुद्ध पडणार इतक्यांत बीना व अरविंद अनुक्रमें ' नरेनभाऊ ' व ' नरेन ' असा कल्लोळ करून त्याला सांवरतात. त्याचवेळीं लिलीच्या हातून कप गळून पडतात. )

( पडदा पडतो )

# २

[ **स्थळ :** पहिल्या अंकाचेंच. वेळ–संध्याकाळीं पांच साडे–पांचची. लिली विणीत बसली आहे. बाहेरून राज प्रवेशून तिला हांक मारतो. त्यानें चिटचा बुजशर्ट परिधान केलेला असतो ].

**राज :** हॅलो मि. दादर बंबखानावाला–

**लिली :** ( चिडून ) आल्याबरोबर तोंडाचा धबधबा वाहूं लागला.

**राज :** धबधबा वहातो कधीं ?–ज्यावेळीं दरी त्याला आर्तस्वरानें हांक मारीत असते, धबधब्या, माझ्या प्राणा, ये, ये ! माझ्या हृदय-मंदिरांत तुझ्या प्रेमाची दिव्यमूर्ति बसविण्यासाठीं मी देव्हारा कोरून ठेवला; अशा वेळीं धबधबा प्राणाचीहि पर्वा न करतां बेफिकीरपणें कड्यावरून खोल दरींत उडी घेतो.

**लिली :** तुझी काव्यमय भाषा समजून घ्यायला, कालीदासांच्या शाकुंतलाचा मला अभ्यास करायला पाहिजे.

**राज :** कांहीं जरूर नाहीं. या शकुंतलेच्या जीवनाची गांठ लग्नाच्या दोरीनं या दुष्यंताबरोबर बांधली, कीं आपल्या प्रेमकाव्याचा ग्रंथ आपोआप लिहून पुरा होईल.

**लिली :** ( त्याला लोटून ) चल दूर हो !

**राज :** अरेच्या, म्हणजे बरोबर दीड महिन्यानं मी तुला भेटत असतांना सुद्धां, तुला माझा तिटकारा वाटावा ना ? काल कलकत्त्याहून आल्याबरोबर तुला प्रथम निरोप पाठविला. कां आली नाहींस मला भेटायला ? ए, अग इकडे पाहा ना ! अशी रुसतेस काय ? अग प्रदीर्घ कालावधीनंतर भेटणाऱ्या प्रियकराला प्रेयसीनं कशी कडकडून मिठी मारली पाहिजे. त्याच्या तोंडा-जवळ तोंड आणून प्रेमाच्या गुलगुल गोष्टी केल्या पाहिजेत. " सख्या... सजणा...राया, तुझ्या विरहानं सुकून गेलें होतें रे मी " असं म्हणून त्याच्या भव्य छातीवर डोकं टेकलं पाहिजे. तें बाजूलाच राहिलं आणि हें भलतंच कांहीं तरी ! बरं आतां गोड हंसशील कीं नाहीं ?

**लिली** : नाहीं.

**राज** : नाहीं? अच्छा ! गुडबाय ! ( जाऊं लागतो. लिली त्याला आडवते )

**लिली** : चल खट्याळ कुठचा ! ( त्याला बिलगते. इतक्यांत आबासाहेब बाहेर जाण्याच्या तयारीनें आंतून प्रवेशतात. लिली व राजला एके ठिकाणीं पाहून संतापतात ).

**आबा** : छान छान ! म्हणजे तुझ्या प्रेमाचं पाडस ह्या जाळींत अडकलंय म्हणायचं. कॉलेज, शिवण क्लास बंद केल्यानंतर घरातल्या घरांत प्रेमाचा क्लास चालू केला आहेस नाहीं ?

**राज** : नमस्ते आबासाहेब ! काय म्हणते आहे आपली प्रकृति ?

**आबा** : माझी प्रकृति बिघडल्याचा जिथं मला थांगपत्ता नाहीं, तिथं ती बिघडल्याबद्दल तुला कोणी फोन केला ? कुठल्या मूर्खानें आपल्या डोक्याच्या तबकडीचे आंकडे फिरवून तुला ही बातमी पोंहोचवली.

**राज** : एकूण आपली प्रकृति ओ. के. आहे तर ! आबासाहेब, लिलीचं व माझं एकमेकांवर फार प्रेम आहे. आजकाल प्रेमाशिवाय लग्न म्हणजे पिवळ्या पगडीशिवाय जांभळ्या रंगाचा बॉम्बे पोलीसला न खुलून दिसणारा ड्रेस ! एखाद्या तरुणीचं एखाद्या तरुणावर बसलं एकदां प्रेम, कीं लागलीच ती आपल्या हृदयांत बसवते त्याची प्रेम !! आजकालचा जमाना हा असा आहे.

**आबा** : आग लागूं दे तुझ्या जमान्याला. ( लिलीला ) तूं कां इथं उभी राहिली आहेस ? चल नीघ–आंत चालती हो !

**राज** : अहो, भायखळा ब्रीजवरील उभ्या पारशाप्रमाणें मी इथं खडा असतांना, ती जागची कशी हालेल ? कारण ती माझी पडछाया आहे. मी सरकल्याशिवाय तिची हालचाल होणं शक्य नाहीं !

**आबा** : काय? काय म्हणालास ?

**लिली** : ( धांदरटपणें ) कांहीं नाहीं... कांहीं नाहीं आबासाहेब ! राज, आज आबासाहेबांची प्रकृति ठीक नाहीं. उगाच कांहींतरी बरळून त्यांच्या डोक्याला अधिक त्रास देऊं नकोस.

**आबा** : आतां माझं डोकं फिरण्याची वेळ आली आहे. म्हणजे मी आजारी असल्याचा शोध तुला सुद्धां लागलेला दिसतो आहे! खबरदार माझ्या वाईटावर उठाल तर—थोबाड रंगवून काढीन!!

**लिली** : शांत व्हा—शांत व्हा आबासाहेब!

**राज** : आबासाहेब, कशाला उगाच तोंडाची मशीनगन चालूं ठेवताहांत? थोड्याच आमच्या ठिकऱ्या उडणार आहेत?

**आबा** : तूं चूप राहा. एक शब्द उच्चारूं नकोस. लिली, अशा उडाण-टप्पू माणसाबरोबर तूं प्रेमाचा संबध ठेवतेस?

**लिली** : माझा नाईलाज आहे आबासाहेब! (कचरत) माझं ... माझं राजवर अगदीं निस्सिम प्रेम बसलं आहे.

**राज** : आणि माझ्या प्रेमाचं भूत हिच्या हृदयाच्या घरट्यांत बसून, चिमणीच्या पोरासारखं चीव चीव करतं आहे! खरं सांगतों आबासाहेब, माझा अन् लिलीचा जोडा म्हणजे लक्ष्मीनारायणाचा जोडा शोभेल!

**आबा** : तो जोडा जमविण्यापूर्वी इंन्जीनच्या दट्ट्याप्रमाणें मध्येंच लुडबूड करणारं तुझं तोंड, पुणेरी जोड्यानं फोडलं पाहिजे.

**लिली** : आबासाहेब, राजला असं टाकून बोलूं नका.

**आबा** : तर तर तुझा राज म्हणजे जसा कांहीं मदनाचाच पुतळा लागून गेला आहे ना! हा पुतळा जर गिरगांव चौपाटीवर उभा केला, तर लोक शेणाचे गोळे ह्याच्यावर फेकायला कमी करणार नाहींत.

**राज** : मि. आबासाहेब, हा साडेतीन हातांचा देह म्हणजे विधात्याच्या अजब कलाकृतीचा एक नमुना आहे! माझ्यासारखा कॅरेक्टर ॲक्टर पृथ्वीच्या पाठीवर तुम्हांला शोधून देखील सांपडणार नाहीं!!

**आबा** : हो तर, तुझ्याखेरीज पृथ्वीवर सगळे नर्मदेंतले गोटेच आहेत ना! लिली, माझ्या परवानगीवांचून ह्याला घरांत कां घेतला आहेस?

**लिली** : माझं जरा ऐकाल का?

**आबा** : कांहीं एक ऐकायचं नाहीं मला! माझी शिस्त फार कडक आहे. समजलं?

**राज** : तर मग आबासाहेब, दरवाज्याबाहेर किंवा बाहेरच्या दरवाज्यावर " नो अॅडमिशन विदाऊट परमिशन " असा बोर्ड लावा. पण सांभाळा हो, तुम्हांला देखील कुणाची तरी परवानगी घेतल्याखेरीज घरांत पाऊल टाकतां येणार नाहीं !

**लिली** : ( रागानें ) राज, जरा स्वस्थ रहायला काय घेशील ? आबासाहेब, खरं सांगतें मी–आम्ही दोघांनीं विवाहबद्ध होण्यासंबंधीच्या आणाभाका, महाकाली मंदिरांत कालीमातेसमोर घेतल्या आहेत—

**आबा** : त्या मंदिरांत घेण्यापेक्षां एखाद्या मशिदींत घेतल्या असत्यांत, तर मशिदींतील घुमटांत तुमच्या प्रेमाचा निनाद चांगलाच घुमला असता. बेशरम कार्टे, पुन्हां रबरासारखी जीभ ताणून सांगायला कांहींच वाटत नाहीं ?

**राज** : ( बजावून ) आबासाहेब, गिरणीच्या भोंग्यांतून बाहेर पडणाऱ्या धुराप्रमाणें, तोंडांतून वाटेल तसले शब्द बाहेर ओकूं नका. ही प्रॉपर्टी जरी तुमची असली तरी माझ्या प्रेमाची मोटारगाडी आहे. मी तिचा ड्रायव्हर आहे ! तिचं स्टेअरिंग माझ्या हातांत आहे. मी वळवेन तशी ती वळेल ! प्रचिती पाहिजे असल्यास गाडी स्टार्ट करतों ! पण त्या अगोदर हॅन्डल तुम्हांला मारावं लागेल !!

**आबा** : तुझ्याबरोबर बोलण्यांत अर्थ नाहीं कारण तुझ्या डोक्याचा स्क्रू ढिला झालेला दिसतो आहे.

**राज** : ( लिलीकडे बोट दाखवून ) आणि तो फिट करण्याचा पाना हा काय तुमच्या समोर आहे. म्हणून म्हणतों एवढा पाना जर मला देऊन टाकलांत तर तुमचे उपकार सातासमुद्राच्या पलिकडे गेलों तरी विसरणार नाहीं !

**आबा** : पुन्हां तुझ्या पांचटपणाला पान्हा फुटूं लागला आहे म्हणायचा ! इथून चालता होतोस कीं–( त्याच्या अंगावर चाल करतो. लिली आडवी येते. )

**लिली** : आबासाहेब, आबासाहेब, असं काय करायचं ? राज, कृपा करून तूं तरी जा—

**राज** : ऑल राइट, आय अॅम गोईंग ! ( बाहेर जातो ).

**आबा** : पुन्हा त्याला आपल्या घरांत घेऊं नकोस, नाहींतर परिणाम फार वाईट होईल हें पक्कं लक्षांत ठेव ! त्याच्या मूर्खपणामुळें महत्त्वाच्या कामाला

जायला मला वेळ झाला आहे. एक दीडशहाणा विधवेला घेऊन रजिस्टर्ड मॅरेज करायला गेला आहे आणि घरांतल्या घरांत तूं प्रेमाचा क्लास उघडला आहेस ! सारा मूर्खांचा बाजार ! ( बडबडत बाहेर जातात. लिली हताशतेनें खुर्चीवर बसते. पुन्हां बाहेरून राज प्रवेशतो. )

**राज :** हॅलो मि. दादर बंबखानावाला—

**लिली :** पुन्हां आलास तूं ?

**राज :** अग गेलोंच नव्हतों. बाहेरच्या दाराआड दडून बसलों होतों.

**लिली :** मेहरबानी केली आहेस माझ्यावर ! कुणाशीं कसं बोलावं हें तरी कळतं का तुला ? यापुढं तुझी भेट घेण्यापूर्वी मला पाठीला तेल लावून बसलं पाहिजे. आपल्या लग्नाचं ॲग्रिमेंट तुझ्या हातांत देण्याअगोदर, माझ्या पांढऱ्या पाठीवर काळ्या रेघांनीं आबासाहेब तें रेखाटून ठेवतील !!

**राज :** आणि तुझ्या पाठीवर फक्त एकदांच मी प्रेमानं हात फिरवला, कीं त्या रेघा आपोआप पुसून जातील ! होय कीं नाहीं ? अग तेवढाच तुझ्या पाठीवर हात फिरवायचा चान्स तर मला मिळेल ! ( हंसतो ) बरं तें जाऊं दे. तुझा अरुदादा नागपूरहून आल्याला दीड महिना झाला आहे, अशी दवंडी पिटवलेली मी त्या कबुतरखान्याजवळ ऐकली. खरी आहे का ही बातमी ?

**लिली :** ( रागानें ) होय; आला आहे ! पण तेवढ्याकरितां कांहीं दवंडी पिटण्याची जरूर भासली नाहीं.

**राज :** अग, दीर्घ कालानं आगमन करणाऱ्या भावाच्या प्रेमानं हुरळून जाणारी तुझ्यासारखी लाडकी बहीण, हमरस्त्यावर ढोल देखील बडवायला कमी करणार नाहीं. बरं कुठं गेला आहे तुझा अरुदादा ?

**लिली :** रजिस्टर्ड मॅरेज करायला. येईल आतां एवढ्यांत.

**राज :** म्हणजे ? ही काय भानगड आहे ?

**लिली :** तें त्यालाच विचारून पाहा.

**राज :** ( मिस्कीलपणें ) बरं लग्नानंतर काय नांव ठेवणार आहेस वहिनीचं !

**लिली :** ( चिडून ) आहे तेंच !

**राज** : पण पहिल्या नांवाचा बोर्ड मी वाचला नाहीं. किती अक्षरीं नांव आहे ?

**लिली** : दोन अक्षरीं !

**राज** : दोन अक्षरीं म्हणजे ... मीना, बीना, नीना पैकीं कुठलं ?

**लिली** : तूं नांव उच्चारलीं आहेस–त्यापैकीं मधलं !

**राज** : ( आश्चर्यानें ) म्हणजे बीना ?

**लिली** : होय. हो पण त्यांत तुला आश्चर्य कां वाटलं ?

**राज** : (चाचरत) नाहीं...तसं कांहीं नाहीं. मी नागपुरला असतांना माझ्या ओळखीची एक बीना नांवाची मुलगी होती. तिचं लग्न तर केव्हांच झालं आहे.

**लिली** : ( कारुण्यपूर्ण ) आमच्या वहिनीचं लग्न देखील या पूर्वीच झालं होतं. पण काळाच्या जटायुनं तिच्या कपाळीचा कुंकूमतिलक, लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांत हिरावून नेला आणि तिच्या मंगळसूत्राची माळ स्वतःच्या चोचींत धरून तिच्या हातांतील हिरवा चुडा स्वतःच्या पायांत घालून, तो क्रूर प्राणी जगाच्या वाळवंटांत वहिनीला निराधार टाकून चालता झाला आहे.

**राज** : म्हणजे अरविंद एका निराधार तरुण विधवेबरोबर पुनर्विवाह करून, जीवनोत्कर्षाचा बिंदु गांठण्याचा प्रयत्न करणार आहे ? किंती आनंदाची बातमी आहे ही ! बरं–जातों मी. सुधारणेचं वल्हं हातांत धरून, समाज नौकेला योग्य तीरावर लावणाऱ्या अरविंदाचं अभिनंदन करायला लौकरच येतों. ( बाहेर जाऊं लागणार इतक्यांत माडीवरून नरेन प्रवेशून त्याला हांक मारतो. )

**नरेन** : राज, अरे जरा थांबशील कीं नाहीं ?

**राज** : थांबलों असतो रे ! पण एक महत्त्वाचं काम करायचं बाकीं राहिलं आहे. हिच्याबरोबर बोलण्याच्या गडबडींत विसरूनच गेलों. थोड्याच वेळांत तुझ्या अरुदादाचं अभिनंदन करण्यास येतोंच कीं मी !

**लिली** : पण थोडावेळ थांबलास तर चालणार नाहीं का ?

**राज** : अग कां चालणार नाहीं ? खोटं नाणं देखील रात्रीच्या बाजारांत चालतं. ( धांदरटपणें ) अच्छा ! गुड बाय ! ( बाहेर निघून जातो )

**नरेन :** काय बरळेल त्याचा पत्ता लागायचा नाहीं. मला वाटतं राजला अक्लेचा वांटा उचलून देत असतांना ब्रह्मदेवाचा हात असावा अक्लेच्या पेटींत आणि उजव्या हातानं बहुतेक तो आपल्या प्रेमदेवतेला टाटा करीत असावा (दोघं हंसतात. हंसता, हंसतां नरेन खिडकींतून पहातो) लिली, तो पहा अरुणदादा व बीनाताई येताहेत. आपण त्यांची गमत करूं या—चल पाहूं !

**लिली :** चल ! (लिलीचा हात धरून नरेन तिला आंत ओढीत नेतो. क्षणभरानें अरविंद व बीना बाहेरून हंसत प्रवेशतात. बीनानं हिरवी वस्त्रें परिधान केलेलीं असतात. दोघांच्याहि गळ्यांत हार असतात. बीनाच्या हातांत तुरा तर अरविंदच्या हातांत मिठाईचा पुडा असतो.)

**अरविंद :** (प्रेमभरानें) बीना, ह्या क्षणाला दिवस असून देखील, सभोंवार रुप्याप्रमाणें चकचाकित चांदणं पडल्याचा भास होतो आहे मला ! आकाशींची बाग फुललेली आहे—चंद्र चंद्रिकेच्या प्रेमाचा सुगंध चोहोंकडे दरवळतो आहे. पण ती चंद्रचंद्रिकेची जोडी आकाशांतील नाहीं तर अवनीवरची आहे. जर का मध्येंच वादळी वारे सुटून काळेकुट्ट ढग वाहूं लागले आणि चंद्र चंद्रिकेवर पांघरूण घातलं गेलं तर काय होईल बीना ?

**बीना :** काय होणार ? ढगाच्या पडद्याआड एकांतवासाची सुवर्णसंधी सांपडल्यामुळें, चंद्रचंद्रिकेचं प्रेमकूजन दुप्पट जोमानं चालू होईल ! चंद्रिकेची मुग्धकळी खुलली जाईल ! त्या कळीच्या हंसऱ्या तंतूंतून वहाणाऱ्या तुषारांनीं चंद्राला अभ्यंग स्नान घातलं जाईल ! (त्याला बिलगते. पुन्हां क्षणभरानें) पण मला तर सारी सृष्टि हिरवीगार दिसते आहे. हा हिरवा चुडा, हें हिरवं पातळ, ही हिरवी चोळी सारं कांहीं हिरवं हिरवं गार दिसतं आहे ! अरविंद, झाडांच्या पानाचा हिरवा रंग कालांतरानें बदलून, त्यांना पिवळा रंग प्राप्त होतो—त्याप्रमाणें आपल्या प्रीतीचा हिरवा रंग कधीं काळीं बदलणार तर नाहीं ना ?

**अरविंद :** नाहीं बीना, असं होणं कधींहि शक्य नाहीं ! कां बरं तुझ्या हळव्या मनामध्यें शंका कुशंकांचे अंकुर निर्माण व्हावेत ?

**बीना :** तसं कांहीं नाहीं अरविंद ! वळवाच्या पावसाच्या सरीप्रमाणें माझ्या मनाला चाटून गेलेली ती एक शंकेची सर आहे. तसं पहायला गेलं

तर आज मला अननुभूत आनंद झाला आहे. जीवनाच्या संधि प्रकाशांत प्रीतीचे सुवर्ण किरण माझ्या मनाचें सोनेरी स्वप्न साकार करीत आहेत. अरविंद, आज तुम्हीं एका तरुण विधवेला पुर्नजन्म दिला आहांत !

**अरविंद** : होय ! तुझ्या सहकार्यानं माझं कर्तव्य मी पार पाडलं आहे !

**वीना** : खरंच अरविंद, आपण उभयतांनीं दिव्य प्रेमाच्या सफलतेसाठीं आपल्या ' प्राणाचं दान ' करण्याची तयारी केली होती, म्हणूनच समाज-नीतीच्या उकिरड्यावर तिष्ठत पडलेली ही ' विधवा ', आपला ' नवा संसार ' मोठ्या थाटामाटानें थाटू शकली ! ( आठवण होऊन ) अगबाई ! आजच्या आनंदाच्या प्रसंगीं लिलीताई व नरेन भाऊंचें तोंड गोड करायचं राहिलंच. त्यांना हांक मारा ना !

**अरविंद** : हांक मारून ती दोघं यायचीं नाहींत. कान धरून त्यांना इथं खेचून आणलं पाहिजे. थांब हं त्यांना घेवून येतों–( तो आंत जातो. ती आनंदानें गाणें गाते. )

विलसे हस्तकी माझिया
हा हिरवा हिरवा चुडा
भाळीं शोभे कुंकुम तिलक
पुनवेचा जणूं चांद दुजा
तैसे मंगळसूत्र गळ्याला
भूषवूनी उध्दरी मजला

( पद संपल्यावर अरविंद एका हातानें लिलीचा व दुसऱ्या हातानें नरेनचा कान धरून त्यांच्यासह आंतून प्रवेशतो. )

**अरविंद** : ही पाहिलीस का आपल्या नागपूरचीं भांडखोर मांजरं ? मी आंत जाण्यापूर्वीच बाहेरच्या मोरींत दडून बसलीं होतीं ! ( वीना हंसते. तो कान सोडतो. )

**वीना** : आतां त्यांना जास्त चिडवूं नका ! नाहींतर हीं नागपूरचीं मांजरं मुंबईच्या मांजरांप्रमाणें तुम्हांला दोन्ही बाजूनीं ओरबडून काढतील ! ( सर्व हंसतात ).

**लिली :** म्हटलं बीना वहिनी, तुमचं ऐन रंगांत आलेलं नाटक, आम्हीं दोघांनी पडद्या आडून चोरून पाहिलं आहे. नाहीं का रे भावड्या ?

**नरेन् :** ( हंसत ) हो बुवा आपल्या तिकीटाचे पैसे टॅक्ससह वसूल झाले आहेत.

**अरविंद :** तर मग मघांपासून तुम्हीं आम्हांला हांक कां मारली नाहींत ?

**नरेन :** चांगलंच सांगतो आहेस ! ऐन रंगांत आलेलं तुमचं नाटक बंद पाडण्याचा आम्हीं मूर्खपणा केला असता, तर प्रेक्षकांनीं कांदे, भजीं, अंडीं तुमच्यावर फेकण्याऐवजीं, आमच्यावर फेंकलीं असतीं ! होय कीं नाहीं लिली ?

**लिली :** तर काय !

**अरविंद :** ( वेडावून ) तर काय ! पहा कशी स्प्रिंगच्या बाहुली-प्रमाणें मान हालवून त्याला होकार देते आहे ती !

**बीना :** अहो, रेवडीवाल्याला गंडेरीवाला साथीदार ! ! बरं तें जाऊं दे. अगोदर तो मिठाईचा पुडा सोडून, ह्या दोघांचं तोंड तर गोड करा—

**अरविंद :** त्या अगोदर हा नाटक कधीं दाखवणार आहे, तें ह्याच्या-कडून कबूल करून घे ना !

**नरेन :** माझं नाटकच पहायचं आहे ना ? आजपासून एक महिन्यानं पहायला मिळेल ! हें पहा माझ्या नाटकाचं हॅण्डबील. ( हॅन्डबील खिशांतून काढून देतो. बीना वाचते. )

**अरविंद :** मी विचारतों, नट्यांचेच फोटो हॅन्डबिलावर कशाला देतां रे ?

**बीना :** माझं देखील तेंच म्हणणं आहे.

**नरेन :** तें तुम्हांला नाहीं कळायचं बीनावहिनी !

**लिली :** आणि ही काय फोटो देण्याची पद्धत आहे ? रिकामे झालेले डी. डी. टीचे डबे फळीवर मांडलेले दिसताहेत—

**नरेन :** आतां जास्त गडबड करशील, तर तेच डबे उचलून तुझ्या टाळक्यांत घालीन ! ( अरविंद व बीना हंसतात ) पहातेस काय अशी डोळे वटारून माझ्याकडे ? मुकाट्यानं इथून चल ! मीया बिबीला एकान्तवासांत बोलूं देशील कीं नाहीं ?

**लिली** : पण बीबीनं मियाचं नांव कुठं घेतलं आहे ? ( नरेन हंसतो. )

**नरेन** : खरंच बीना वहिनी, लग्नानंतर नांव घेण्याची प्रथा आहे. तुला देखील अरुदादाचं नांव घेतलंच पाहिजे !

**बीना** : इश्श ( लाजते )

**लिली** : इश्श काय ? तुझ्यासारखी मी नवरी असतें, तर चटकन नवऱ्याचं नांव घेतलं असतं.

**अरविंद** : तूं लाजूं नकोस बीना, घे खुशाल माझं नांव !

**बीना** : बरं बाई घेतें — ( नांव घेते ) " अत्तरांत अत्तर सुवासिक हीना, अरविंदाचं नांव घेते लाडकी त्यांची बीना. "

**लिली** : ( बीनाला चिडवून ) अत्तरांत अत्तर सुवासिक हीना—

**नरेन** : अरविंदाचं नांव घेते लाडकी त्याची बीना ! ( सर्व हंसतात. नरेन व लिली हंसतां हंसतां आंत जातात. जातांना लिली मिठाईचा पुडा नेते. )

**अरविंद** : पाहिलंस ना दोघंहि किती अल्लड स्वभावाचीं आहेत तें !

**बीना** : नरेनभाऊ व लिलीताई म्हणजे जणूं काय स्वच्छंदानें विहार करणारीं दोन पांखरें आहेत. आबासाहेबांनीं सोनेरी पिंजरा बनवून त्या पाखरांना पारतंत्र्यांत जखडून ठेवलं आहे. तुम्ही जर काहीं प्रयत्न केलांत, तरच स्वातंत्र्यसूर्याच्या प्रखरतेनें, त्या उभयतांच्या मनाभोंवतीं ज्या पारतंत्र्याच्या बेड्या जखडल्या आहेत, त्या वितळल्या जातील, अरविंद !

**अरविंद** : बीना, प्रत्येक वेळीं तुझ्या तोंडचे अमृतमय बोल ऐकून, तुझ्या रूपसौंदर्याप्रमाणें गुणसौंदर्याचं प्रदर्शन देखील मला मोफत पहायला मिळत असतं. तूं फक्त रूपवान् नाहींस, तर सद्‌गुणाची पुतळी आहेस. तुला जन्माला घालतांना, विधात्यानं एकाच तराजूच्या दोन पारड्यापैकीं एकांत रूप व दुसऱ्यांत गुण ओतले असले पाहिजेत, त्याशिवाय दोन्हीं सौंदर्यांचा संगम असा सहजासहजीं होणं शक्य नाहीं.

**बीना** : ( लाडीकपणें ) तुम्हीं तर प्रत्येक वेळीं माझ्या सौंदर्याचंच वर्णन करीत असतां !

**अरविंद** : तुझ्या नजरेला नजर भिडली, कीं जिभेवर नृत्य करणारे शब्द आपोआप बाहेर पडतात त्याला मी तरी काय करूं ?

**वीना** : त्यापेक्षां माझी नजरच बंद करून टाका ना !

**अरविंद** : टाकतों हं--( खिशांतील गॉगल काढून तिच्या डोळ्यांना लावतो. )

**वीना** : छान ! ही चांगलीच कल्पना लढवलींत म्हणायची !

**अरविंद** : नजर बंद झाली, पण तुझ्या केसाचं वर्णन करायची मला हुक्की यायची, म्हणून केस देखील झांकून टाकतो ( खिशांतील सिल्कचा हिरव्या रंगाचा रुमाल काढून तिच्या डोक्यावरून मानेखालीं बांधतो. )

**वीना** : सोडा मीच बांधते. ( ती रुमाल बांधीत असतां, तो लाईटर किंवा आगकाडीनें सिगारेट शिलगावतो. ती फुंकर मारून काडी विझवते. तो सिगारेट तोंडांतून काढून घेतो ) हें पहा, यापुढं तुम्हांला सिगारेट ओढतां येणार नाहीं !

**अरविंद** : म्हणजे ! हा जुलुमच झाला म्हणायाचा ! अग तूं एकदां सिगारेटचा झुरका मारून पहा ! त्याशिवाय तुला सिगारेटची लज्जत कळणार नाहीं ! मी फक्त एकच पाकीट संपवतों, पण जर तूं ओढूं लागलीस, तर दिवसांतून सात सात, आठ आठ पाकीटांचा फन्ना उडवशील !! (तो हंसतो)

**वीना** : ( लटक्या रागानें ) चला, कांहीं तरीच ! ( करारीपणें ) तुम्हांला सिगारेट ओढतां येणार नाहीं.

**अरविंद** : राणी सरकारांची आज्ञा मान्य ! आजपासून सिगारेट सोडली. उद्यांपासून विडी ओढायला सुरुवात करतों—

**वीना** : आणि विडीला बंदी घातली तर चिरूट ओढतों ! असंच कीं नाहीं ?

**अरविंद** : अग चिरुट मिळाला नाहीं तर कोऱ्या कागदाच्या सुरनळ्या करून ओढीन ! ( दोघं हंसतात. ) वीना, तुझी नजर बंद केली. केसांवर झांकण घातलं, पण तुझ्या सौंदर्याचा कहर कमी होण्याऐवजीं, तूं अधिकच सुंदर दिसते आहेस. खरं सांगू का, तुझ्याऐवजीं मी जर ड्रॉईंग टीचर अगर

चित्रकार असतों, तर सारखीं तुझीं चित्रं रेखाटीत बसलों असतों–( बीना हंसते. हंसतां हंसतां रुमाल व गॉगल काढते. )

**बीना :** सारखी माझ्या सौंदर्याची पोथी वाचून दाखविली जाते आहे. पण हरिदासबुवांना दक्षणा नाहीं, तर निदान मला पोथीवर एक फूल तरी वाहूं दे ! ( त्याच्या कोटाच्या कॉलरला फूल लावते ).

**अरविंद :** ( फूल काढून ) हें फूल इथं शोभणार नाहीं. सुंदर फुलाचं स्थान नाजुक रमणींच्या केशशिखरावरच असतं !

**बीना :** तसं जरी असलं तरी पराक्रमी पुरुषानं परिधान केलेल्या कोटाच्या कॉलरवरचं तें फूल अधिक खुलून दिसतं. हें फूल इथं राहूं दे. ( पुन्हां त्याच्या कोटाच्या कॉलरला लावते. ) अरविंद, ह्या फुलाचा सुगंध घेऊन झाल्यानंतर, मूळ पुरुषाच्या जातीवर जाऊन हें फूल चुरगाळून टाकण्याची दुर्बुद्धि तर तुम्हांला प्राप्त होणार नाहीं ना ?

**अरविंद :** नाहीं बीना ! ( इतक्यांत बाहेरून राजन प्रवेशतो. त्याची व बीनाची दृष्टादृष्ट होते. दोघं भेदरतात. अरविंदचें राजकडे लक्ष जातें ) ओ हो राज !

**राज :** अरविंद, ग्लॅड टू सी यू ! मला वाटतं आतांच विवाहबद्ध होऊन आलेला दिसतो आहेस.

**अरविंद :** होय आतांच आलों. बरं तुला आतां माझ्या मिसेसची ओळख करून देतों हं. ही माझी मिसेस बीना आणि बीना, हा माझा मित्र राज– अगदीं विनोदी प्राणी आहे बरं का !

**बीना :** ( चोरट्या मुद्रेनें ) नमस्ते !

**राज :** ( भेदरलेल्या अवस्थेंत ) नमस्ते !!

**अरविंद :** अरे राज, तूं देखील नागपूरला होतास नाहीं ?

**राज :** होय–दोन अडीच वर्षापूर्वी !

**अरविंद :** अलीकडे फार सुधारणा झाली आहे नागपूरला. कांहीं विचारूं नकोस. ( मध्येंच ) अरे पण बैस ना ! असा भेदरलेल्या माणसासारखा काय करतोस ? ( राज बसतो ) बरं मी लिलीला चहा करायला सांगतों–कारण

लिलीच्या हातचा चहा तुला अधिक गोड लागतो असं लोकांचं म्हणणं आहे ! ( राज हंसतो. )

**राज :** पण मला आतां चहा नको आहे.

**अरविंद :** अरे वा ? माझ्या आग्रहाखातर तरी तुला चहा घेतलाच पाहिजे. बीना, तूं राजबरोबर गप्पा मारीत बैस. अग ह्याच्याबरोबर बोलतांना हंसतां हंसतां पुरेवाट होईल तुझी ! ( हंसत हंसत अरविंद आंत जातो. क्षणभर शांतता पसरते. नंतर राज बोलण्यास सुरुवात करतो. )

**राज :** बीना, बोलत का नाहींस ? दोन अडीच वर्षांच्या प्रदीर्घ कालावधी-नंतर ह्या राजनचा विसर पडला का तुला ? मागील आठवणी, प्रीतीचीं गाणीं अन् तीं गात असतांना, आपण केलेली एकमेकांची मनधरणी, साऱ्या-साऱ्या गोष्टींचा विसर पडला का तुला ?

**बीना :** नाहीं राज ! तुझ्या व माझ्या दोघांच्याहि हृदयांना, पिसाळलेल्या मांजराप्रमाणें ओरखडे काढून गेलेल्या त्या घटना, मी अशी सहजासहजीं विसरेन का ? शरिरावरच्या जखमा कालांतरानें बुजल्या जातात—पण हृदयावरच्या जखमा, कधींतरी बुजल्या गेल्या आहेत का ?

**राज :** ( रुद्ध स्वरांत ) त्या देखील बुजल्या जातात नाहीं असं नाहीं ! पण माणसाच्या बाबतींत हवी असलेली वस्तु मिळणं व चिरकाल टिकणं ही अपवादात्मक घटना आहे.

**बीना :** खरं आहे तुझं म्हणणं ! आणि म्हणूनच दोन वर्षांपूर्वीं मला जिचा हव्यास लागला होता, ती तुझी मूर्ति माझ्या पुढ्यांत उभी असून देखील तिच्याकडे पाहण्याचा माझा त्यावेळचा व आतांचा दृष्टीकोन, ह्यांत जमीन-अस्मानाएवढं अंतर आहे.

**राज :** या पुढं माझ्याकडे पाहायचा दृष्टीकोन तुला बदललाच पाहिजे. तो जर बदलला नाहींस आणि त्याची जाणीव अरविंदला झाली, तर तो तुझा पति मनामध्यें संशयाचं बीं पेरून घेईल—इतकंच नव्हे तर आकांड तांडव माजवून तुझ्या नजरेच्या दुर्बिणीच्या कांचा फोडायला देखील मागं पुढं पहाणार नाहीं !

**बीना :** ( असहाय्यतेनें ) राज——

**राज** : खरं सांगतों आहे मी बीना ! कारण चिखलांत खितपत पडलेल्या तुझ्यासारख्या कमळाला, समाजनीतीची तमा न बाळगतां अरविंदानं आपल्या हृदयमंदिरांतील पुजेला लावलं आहे, असं असतांना तुझ्याकडून त्याच्या प्रेमाची प्रतारणा केली गेली, तर त्याच्या रागाचा पारा चढल्याशिवाय राहील का ?

**बीना** : नाहीं, नाहीं राज ! अरविंदांच्या निस्सिम प्रेमाची प्रतारणा मी स्वप्नांत देखील करणार नाहीं. ज्या दिवशीं अरविंदांच्या प्रेमाचा झरा माझ्या हृदयांतून आटला जाईल, त्या दिवशीं मी विहिरींत जीव दिलेला असेन ! विष प्राशन करून आत्महत्या केलेली असेन किंवा एखाद्या आगगाडीखालीं माझ्या शरिराचे छिन्न विछिन्न तुकडे झालेले असतील, राज !

**राज** : बीना, अरविंदावर असलेलं तुझं निस्सीम प्रेम पाहून माझा कंठ आनंदानं दाटून आला आहे. अरविंदासारख्या थोर माणसाच्या आधारावरच तुझ्या जीवनवेलीची जोपासना चांगल्या प्रकारें होइल !

**बीना** : होय राज, अरविंदामुळेंच माझी जीवनवेल पुलकीत झाली आहे. नाहींतर लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांत पति वारलेल्या अभागिनीचं—एका तरुण विधवेचं जीवन म्हणजे सहारा वाळवंट बनलं असतं !

**राज** : ( निःश्वास सोडून ) खरं आहे ! ( थोडा वेळ थांबून ) तुझे पति वारल्याची दुर्दैवी घटना लिलीकडूनच मला कळली आहे.

**बीना** : माझी कर्मकहाणी बाजूला राहूं दे पण किती दिवसांनीं तूं भेटलास मला ! किती आनंद झाला आहे म्हणून सांगू तुला ? (आवेगानें) ह्या पुढं ह्या तुझ्या बहिणीला ‘ ताई ’ म्हणून हांक मारशील ना राज ?

**राज** : ज्या तोंडानं मी तुझ्याबरोबर प्रीतीच्या गुजगोष्टी करीत होतों, त्याच तोंडावाटें ‘ ताई ’ अशी हांक मारूं ? ( उद्गारतो ) ताई ऽऽ

**बीना** : भाऊ ( नकळत उद्गारते. त्याचवेळीं आबासाहेब बाहेरून प्रवेशून त्यांचें बोलणें आडून ऐकतात )

**राज** : ( खिशांतून लाल रंगाचा सिल्कचा रुमाल काढून ) ताई, दोन वर्षांपूर्वी तूं मला दिलेली ही प्रेमाची भेट, आज बंधुप्रेमानं मंत्रून तुझ्या लग्नाप्रीत्यर्थ आज मी तुला परत करीत आहे.

**बीना :** राज, ही भेट परत घेण्याकरितां मी तुला दिलेली नव्हती, तर दीर्घकाल पर्यंत माझी आठवण म्हणून जपून ठेवण्याकरितां दिली होती. असूं दे राज, तुझ्याच जवळ तो रुमाल असूं दे.

**राज :** ( सद्गदित् कंठानें ) नाहीं बीना–ह्या रुमालाचा मी पुन्हां कधींहि स्विकार करणार नाहीं ! कारण ह्या रुमालाकडे लक्ष जातांच, पूर्वस्मृतींचा सारा चित्रपट माझ्या नजरेसमोर उभा राहतो. अंकाचा पडदा वर गेल्यानंतर सुरूं होणाऱ्या नाटकाप्रमाणें. आपल्या प्रीतीच्या नाटकाचे सारे प्रसंग माझ्या नजरेसमोर उभे राहतात आणि त्या नाटकांतील मी दुर्दैवी नायक असल्याबद्दल मला फार दुःख होतं. म्हणून म्हणतों बीना, हा रुमाल तुझ्याजवळच असूं दे ! ( रुमाल देतो. ती स्वीकारते व पदराआड दडवते. )

**बीना :** तूं दुर्दैवी नायक नाहींस राज, तर मीच दुर्दैवी नायिका आहे–आणि म्हणूनच संकटाचे सागर व दुःखाचे डोंगर माझ्या आयुष्यांत निर्माण झाले होते. ( इतक्यांत आबासाहेब खांकरत पुढें होतात. ती दोघं चपापतात.)

**आबा :** ( रागानें ) राज, पुन्हां माझ्या घरांत आला आहेस ?

**राज :** आपल्याला त्रास होत असेल तर ह्याच क्षणाला जातो मी. बरं बीनाताई, येतो हं मी ! ( झटकन निघून बाहेर जातो. )

**आबा :** ( उपहासानें ) बीनाताई हं ! मघांपासून ताईभाईचं काय चाललं होतं ?

**बीना :** म्हणजे ? ( लिली आंतून चहाचा ट्रे घेऊन प्रवेशते. पण गंभीर वातावरण पाहून पुन्हां आंत जाते ).

**आबा :** एका नवऱ्याची पाठवणी लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांत स्वर्गमंदिरांत करून मोकळी झालीस ! दुसऱ्या दीड शहाण्याबरोबर नुकतीच रजिष्टर मॅरेज करून इथं आली आहेस, तोंच तिसरा गांठविण्याची तयारी कां चालूं ठेवली आहेस ?

**बीना :** (बावरून) तुम्हांला काय म्हणायचं आहे, तेंच मला कळलं नाहीं–

**आबा :** कसं कळेल ? नवीन नवीन पुरुषांच्या मागं सैरावैरा धावणारं तुझं मन जाग्यावर असेल तेव्हां ना !

**बीना :** ( असहाय्यतेनं ) आबासाहेब–

**अरविंद :** ( आंतून प्रवेश करीत ) काय झालं आबासाहेब ?

**आबा :** मला काय विचारतोस ? दिनरात जिचं मनोभावें पूजन करतोस, त्या ह्या तुझ्या प्रेमदेवतेलाच विचार !

**अरविंद :** काय झालं बीना ?

**बीना :** ( गांगरून ) कांहीं नाहीं...कांहीं नाहीं अरविंद !

**आबा :** खोटं बोलूं नकोस. जें कांहीं नुकतंच घडलं आहे तें मी माझ्या उघड्या डोळ्यांनीं पाहिलं आहे. हिच्या आणि राजच्या प्रेमनाटकाची रंगीत आणि संगीत दोन्ही तालमी मी नीट न्याहाळून पाहिल्या आहेत!

**अरविंद :** ( चौकसपणें ) पण इतक्यांत राज कुठं गेला ?

**आबा :** तुझ्या बायकोला प्रेमाची भेट देऊन चालता झाला आहे !–

**अरविंद :** ( चिडून ) आबासाहेब, बीनाबद्दल वेडंवाकडं बोललेलं मला कधींहि सहन होणार नाहीं ! !

**आबा :** मला धमकी देण्यापूर्वीं तुझ्या बायकोजवळ असलेली–राजनं तिला दिलेली भेट जरा निरखून पाहा आणि मगच आपली चर्पटपंजरी चालूं कर !

**अरविंद :** बीना काय दिलं आहे राजनं तुला ?

**बीना :** ( भेदरून ) कांहीं नाहीं अरविंद !

**अरविंद :** ( दटावून ) बीना–खरं सांग.

**बीना :** ( काकुळतेनें ) खरं सांगतें–पण तुम्ही माझ्यावर रागावणार नाहीं ना ? ( चाचरत ) हा...हा रुमाल राजनं मला भेट म्हणून दिला आहे ! ( रुमाल दाखवते. )

**अरविंद :** ( रुमाल घेत ) हा रुमाल राजनं तुला भेट म्हणून दिला आहे आणि त्याचा तूं मोठ्या आनंदानें स्वीकार केला आहेस नाहीं ?

**आबा :** फक्त रुमाल पहातोस काय ? त्याच्यावर रंगीत सुतानं विणलेलं नांव वाच !

**अरविंद :** ( वाचतो ) बीना...राजन ( विचारांत पडतो )

**आबा :** आतां तरी ह्या तुझ्या शंभर नंबरी सोन्याची तुला गॅरंटी देतां येईल का ?

**अरविंद :** ( उद्वेगानें ) बीना–काय प्रकार आहे हा ?

**आबा :** अरे ती काय उत्तर देणार ? चोराचीं पावलं ओळखायला माझ्यासारखा तर्कज्ञानीच माणूस पाहिजे !

**बीना :** ( काकुळतेनें ) आबासाहेब ! अरविंद, कसं पटवून देऊं तुम्हांला कीं राजनं बंधुप्रेमानं प्रेरीत होऊन, 'ताई' अशी प्रेमळ हांक मारून ही अल्पशी भेट बंधुप्रेमाचं प्रतीक म्हणून मला दिली आहे.

**अरविंद :** एवढा जर भगिनी–प्रेमाचा त्याला पुळका आला होता, तर ही भेट त्याला दुसऱ्या भेटींत नसती का देतां आली ?

**आबा :** आणि मी विचारतों कीं त्या रुमालावर 'बीना–राजन' ह्या नांवांचे शिक्के मारण्याची काय आवश्यकता होती ?

**बीना :** तें मला सांगतां येणार नाहीं ! पण वाईट हेतूनं मी ह्या रुमालाचा स्वीकार केलेला नाहीं. खरं म्हणजे कांहीं वर्षांपूर्वींच नागपूरला असतांना, हा रुमाल राजजवळ भेट म्हणून मीच दिला होता.

**अरविंद :** अस्सं ! सौंदर्याच्या पोटीं हलाहल असतं, हें आज मला पटलं आहे !

**आबा :** ज्या बाहुलीच्या सहाय्यानं तूं आपल्या संसाराचा खेळ मांडण्यास सुरुवात केली होतीस, ती ही बाहुली गोरीगोमटी पण कपाळकरंटी आहे, हें आतां तरी तुझ्या लक्षांत आलं आहे ना ? आतां नीट कानाचे पडदे उघडून ऐक, जर का ह्यापुढं ह्या मेणाच्या बाहुलीला घरांत थारा दिलास, तर कांहीं दिवसांनीं ही तुझ्या तोंडाला शेण फासायला कमी करणार नाहीं. हें घर म्हणजे कालांतरानें वेश्येचं घर होईल ! हा दिवाणखाना म्हणजे कुंटणखाना म्हणून ओळखला जाईल ! ! म्हणून म्हणतों अऱ्या, ह्या कलंकिनीला ह्या घराचा दरवाजा कायमचा बंद करून टाक !

**बीना :** ( आक्रोश करून ) नाहीं, नाहीं, मी कलंकिनी नाहीं. मी एक निराधार कमनशिबी स्त्री आहे. ह्या घरांतून मी बाहेर जाणं शक्य नाहीं ! ( प्रतिज्ञापूर्वक ) एका दुर्दैवी तरुण विधवेला ह्या घरांत मृत्यु येऊन, ह्याच

घरांत ती सधवा म्हणून जन्माला आलेली आहे ! मरतांना देखील शेवटच्या घटका ती ह्याच घरांत मोजील ! !

**आबा :** ह्या घरांत तुला एक क्षण देखील राहतां येणार नाहीं ! अन्या, लवकरच हिची विल्हेवाट लाव–नाहींपेक्षां हिच्यासह तूं देखील घराची पायरी उतर ! समजलं ? ( चरफडत आंत जातो. अरविंद दुःखानें विचारमग्न होतो. बीना अश्रू ढाळीत असते. )

**अरविंद :** ( व्यथित होऊन ) हा रुमाल आपल्या निस्सीम प्रेमावर पांघरूण घालण्याकरितां का तूं राजनजवळ देऊन ठेवला होतास ? कोणतं उद्दिष्ट तुला साधायचं होतं म्हणून प्रेमाचं जाळं तूं माझ्या भोंवतीं पसरून, एखाद्या पारध्याप्रमाणें माझी शिकार साधली आहेस ?

**बीना :** ( रडव्या स्वरांत ) अरविंद, अशातऱ्हेचे वाग्बाण सोडून माझ्या अधु झालेल्या हृदयाला अधिक घायाळ करूं नका. अविचाराची फुंकर मारून प्रीतीचा दीपक मालवूं नका ! गडद अंधःकारांत ठेंचाळेन मी अरविंद !

**अरविंद :** अंतरीची प्रीतीची ज्योत विझली गेल्यानंतर, प्रीतीचा दीपक पुन्हां पेटण्याची शक्यता तरी आहे का ?

**बीना :** कां नाहीं अरविंद ? गैरसमज दूर करून विचाराचं तेल दिव्यांत भरल्यानं, पुन्हां प्रीतीची ज्योत प्रकाशाची देणगी सहज देऊं शकेल ! !

**अरविंद :** ( त्राग्यानें ) पण हा रुमाल ? ह्या सहा इंच लांब आणि रुंद असलेल्या कापडाच्या तुकड्यानं, प्रीतीच्या हिंदोळ्यावर झोके घेणाऱ्या माझ्या हृदयाचे शतशः तुकडे केले आहेत !

**बीना :** असा त्रागा करूं नका अरविंद ! तुमच्या समाधानाकरितां राजनं मला दिलेली ही प्रेमाची देणगी, मी त्याला साभार परत करायला तयार आहे.

**अरविंद :** आतां काय उपयोग आहे तसं करून ? ( सद्गदित होऊन ) कांचेच्या मण्यांतून हिरकणी म्हणून निवडली जावी आणि चुकून गारगोटी हातांत यावी, गुलाबाच्या फुलाच्या सुगंधानं उन्माद चढलेल्या मनाची तृप्ति करण्याकरितां, तें फूल तोडण्यासाठीं म्हणून डहाळीला हात घातला जावा आणि फुलाऐवजीं त्याचे कांटेच हाताला बोंचले जावेत, मोठ्या आतुरतेनं अमृताचा

प्याला तोंडाला लावावा आणि अमृताऐवजीं त्या प्याल्यांत हलाहल असल्याची जाणीव अकल्पितरीत्या व्हावी, त्याप्रमाणें माझ्या जीवनाला घातक असलेल्या घटनेच्या भोंवऱ्यांत सांपडलों आहें मी !

**बीना :** ( कळवळून ) नका अरविंद, विषारी शब्दांचे सुरुंग लावून आपल्या प्रीतीचा मनोरा असा ढांसळून पाडूं नका. माझ्या कोमल हृदयावर शाब्दिक घाव घालण्याऐवजीं, मला मारहाण करा–माझं सारं शरीर रक्तबंबाळ करा ! माझ्या शरिरांतून रक्ताचे फवारे उडूं लागले कीं तुमचा क्रोधाग्नी शांत होईल ! आणि इतकंहि करून तो अग्निदेव शांत झाला नाहीं, तर माझ्या शरिराची चिरफाड करा ! माझ्या आंतड्यांचा हार अग्नि देवाला घालून, माझ्या काळजाचा त्याला नैवेद्य दाखवा ! पण ह्या अभागिनीच्या हृदयावर वज्राघात करूं नका ! कराल ना एवढं माझ्यासाठीं अरविंद ?

**अरविंद :** मी कांहीं सांगूं शकत नाहीं बीना ! ( अधिक त्राग्यानें ) ह्या लाल भडक कापडाच्या तुकड्यानं आपल्या प्रेमाची हिरवी पताका कायमची झांकून टाकली आहे.

**बीना :** शांत व्हा अरविंद ! मी तुमच्या कोटाच्या कॉलरला लावलेल्या फुलाकडे पाहा आणि त्या फुलाप्रमाणें, तुमच्या प्रीतीच्या फुलाला, ह्या बीनाला तुमच्या हृदयांतील देवपूजेला लावा.

**अरविंद :** ( फूल हातांत घेऊन ) हें फूल तूं माझ्या कोटाच्या कॉलरला मोठ्या प्रेमानं लावलंस आणि कांहीं वेळानं माझ्या हृदयाच्या कोटाचं अस्तर फाडून तूं ह्या रुमालाच्या रूपानं मला दाखवलं आहेस ! तें हें फूल केवळ तुझ्या शब्दाकरितां न चुरगाळतां पुन्हां मी तुझ्या स्वाधीन करीत आहें. ( फूल तिच्या अंगावर फेकतो ).

**बीना :** ( असहाय्यतेनें ) अरविंद–

**अरविंद :** ( दुःखातिशयानें ) फुलाचा सुगंध घेण्यापूर्वीच, मोठ्या नाईलाजानं मला त्याचा त्याग करावा लागत आहे ! कारण त्या फुलाचा सुगंध विषारी आहे...विषारी आहे...विषारी आहे ! ( आवेगानें आंत जातो. )

**बीना :** अरविंद ! अरविंद ! ( फूल उचलून ) फुला, मोठ्या आदरानें तुला मानवाकडून परमेश्वराच्या शिरोभागीं बसवलं जातं पण...अरविंदानीं

ज्या प्रेमानं तुझ्या पाठीवर मायेचा हात फिरविला, त्याच हातानं तुला झिडकारून द्यावं ना ? रडूं नकोस फुला ! तुला असं धाय मोकलून रडतांना पाहिलं म्हणजे माझ्या हृदयकमलाच्या पाकळ्या गळून, अश्रूंच्या रूपानें माझ्या नयनांवाटें बाहेर पडतात. म्हणून म्हणतें फुला रडूं नकोस ! रडूं नकोस म्हणतें ना ? ( फुलाला हृदयाशीं कवटाळते व स्फुंदत असतांनाच हताशतेनें गाणें म्हणते. )

भंगलें मम स्वप्न मनीचें
आजवरि जें गुंफित आलें
आशारूपी प्रकाश विरला
निराशेचा तिमीर दाटला
मंगल मंदिर प्रीतीचें तें
ढांसळूनी क्षणीं या पडलें

( पद संपल्यावर लिली दुःखी मुद्रेनं प्रवेशून बीनाला हांक मारते ).

**लिली** : बीना वहिनी—

**बीना** : लिलीताई ! ( भारावलेल्या अंतःकरणानें तिला मिठी मारते )

**लिली** : काय झालं बीना वहिनी ? आंत अरुदादा निराश मुद्रेनें डोकं धरून बसला आहे, तूं इथं अश्रू ढाळीत उभी आहेस ! कांहीं वेळापूर्वी तुम्ही दोघं हंसत होतां, आणि क्षणांत उदासीनतेची छाया तुमच्या चेहेऱ्यावर कां पसरली जावी ?

**बीना** : लिलीताई, अक्राळविक्राळ जबडा पसरून माझा बळी घेण्याकरितां, दुर्दैवरूपी राक्षस टपून बसला आहे. माझ्या पंचप्राणानं माझा त्याग केला आहे आणि त्यामुळें आत्मा नसलेलं शरीर, म्हणजे मूर्तिविना रिकामा झालेला देव्हारा मला सुना सुना वाटतो आहे.

**लिली** : हो, पण असं झालं तरी काय ? तें तर सांगशील कीं नाहीं ?

**बीना** : कशाला विचारतां माझ्या जीवनाची कटू कहाणी ? ती ऐकल्यानं तुम्हीं मला दोष द्याल, आबासाहेबांप्रमाणं तुम्हीं मला कलंकिनी, पापिणी संबोधाल आणि तुम्ही केलेले वाक्प्रहार असाह्य होऊन मी घायाळ होईन ! कदाचित् या जगाचा कायमचा त्याग करीन ! !

**लिली :** तर मग वहिनी, नको सांगूस मला तुझी कर्मकहाणी! मला ऐकायची नाहीं ती!

**बीना :** आतां ती तुम्हांला ऐकलीच पाहिजे. आपलं दुःख दुसऱ्यानं ऐकलं म्हणजे माणसाच्या मनाला थोडंसं समाधान वाटतं! मन कठोर करून ऐका! आतां कांहीं वेळापूर्वीच अरविंदांच्या व माझ्या प्रेम सूर्याला खग्रास ग्रहण लागलं आहे!!

**लिली :** पण...पण बीना वहिनी...(अडखळते).

**बीना :** पण आणि परंतुची वजाबाकी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं लिलीताई! माझ्या दुर्दैवानं पुन्हां सुरू केलेला रस्सीखेचीचा खेळ आहे हा! (थोड्या वेळानें) कांहीं वेळापूर्वींच राज इथं मला भेटून गेला—

**लिली :** (आश्चर्यानें) राज?

**बीना :** होय राज! (उद्वेगानें) तुमच्या प्रीतीचा परमेश्वर व एकेकाळीं ह्या दुर्दैवी बीनाचा असलेला हृदयेश्वर!! (लिली भेदरते) अशा भेदरू नका. पुढं ऐका!

**लिली :** (शंकाकुल होऊन) तुझा व राजचा संबंध कुठं आला होता?

**बीना :** नागपूरला! राज आपल्या काकांकडे नागपूरला कांहीं दिवस शिक्षण घेत होता. मी व राज दोघंहि एकाच शाळेंत होतों. शाळेंत असतांनाच आमची मैत्री जमली. मैत्रीचं रूपांतर सहवासांत होऊन, सहवासाचं रूपांतर प्रेमांत झालं व लवकरच त्याला लग्नाचं 'कंपाऊन्ड' घालण्यापर्यंत आमची मजल पोहोंचली! पण मध्येंच वादळी वारा सुटून आमची प्रेमनौका हेलखावे खात असतां एक दिवस डुबली गेली. माझं लग्न माझ्या वडिलांनीं एका श्रीमंत तरुणाबरोबर जमवलं—आणि अखेर सक्तीनं मला त्याच्या गळ्यांत माळ घालावी लागली!!

**लिली :** पण मी विचारतें, तुझ्या पसंतीस न उतरलेल्या माणसाच्या गळ्यांत माळ घालून, त्याला आपला कुंकवाचा धनी बनवून घ्यायला तूं कशी तयार झालीस?

**बीना :** मी तोंडानं वडिलांना प्रतिकार करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण तो व्यर्थ होता. राजबरोबर कुठंतरी दूर पळून जाण्यासाठीं माझं मन एका पायावर

तयार होतं, पण अंतर्मनानं मारलेली गांठ मला कांहीं सोडतां आली नाहीं. ( थांबून ) माझा अकल्पितरीत्या झालेला त्याग राजला असह्य झाला आणि अचानक एक दिवस राज मुंबईला निघून आला. मुंबईला येतांना राजनं माझा निरोप घेतला, त्यावेळीं 'बीना–राजन' हीं नांवं रेशमी सुतानं विणलेला रुमाल, मी प्रेमाची भेट म्हणून राजला दिला होता ! तोच रुमाल आज माझ्या पुनर्विवाहानंतर राजनं मला बंधुप्रेमानं मंत्रून परत करीत असतां, आबासाहेबांनीं पाहिलं आणि अरविंदांच्या मनांत विषाची पेरणी केली ! त्यामुळें अरविंदांचा गैरसमज झाला आहे.

**लिली :** घाबरूं नकोस तूं. मी तुला योग्य तोच न्याय मिळवून देईन ! हो, पण तुझे पति वारले कधीं ?

**बीना :** लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांनीं ! लग्नाअगोदरपासून आजारी होते ते ! कसल्यातरी महारोगानें पछाडलें होतें ! ! पति वारल्यानंतर फुटक्या कपाळाची–पांढऱ्या पायाची अशा शब्दांनीं सासरच्या–माहेरच्या दोन्हीकडील माणसांकडून माझीं संभवना करण्यांत आली. तो जाच सहन न झाल्यामुळें मी जीवनाला कंटाळलें व एकाचवेळीं दोन्ही घरांचा त्याग केला.

**लिली :** पण अरुदादाची व तुझी ओळख कुठं झाली ?

**बीना :** मी. डी. टी. सी. परीक्षा पास झालें असल्यामुळें मला अरविंद ज्या शाळेंत शिक्षक आहेत त्याच शाळेंत ड्रॉईंग टीचर म्हणून नोकरी मिळाली. तिथंच अरविंदांची व माझी मैत्री जमली आणि त्यानंतर आतांपर्यंत सारं कथानक कसं घडलं आहे, हें तुम्हांला ठाऊक आहेच. अशी आहे माझ्या कर्माची कटु कहाणी ! ( स्फुंदूं लागते ).

**लिली :** वाईट वाटून घेऊं नकोस वहिनी. अरुदादाला समजावण्याचा मी प्रयत्न करीन !

**बीना :** नका लिलीताई, माझ्या हिताकरितां तुम्हीं कांहींच प्रयत्न करूं नका. माझ्या दैवाची नौका वादळी वाऱ्यांतून कोणत्याहि दिशेला वहात जाऊं दे. खडकावर आदळून ती फुटली गेली तरी त्याची मला आतां पर्वा नाहीं ! कारण हें वादळ आतां कधींहि थांबणार नाहीं !

**लिली :** वादळाचा शेवट हा कधींतरी होतोच बीना वहिनी ! नाहीं झाला तर मी करीन त्याचा शेवट ! ( इतक्यांत आंतून अरविंद त्रस्थ मुद्रेनें

प्रवेशतो ) हा पाहा अरुदादा आला. अरुदादा, बीना वहिनीला टाकून बोलतांना तुझ्यावरील तिच्या निस्सीम प्रेमाची जाणीव, तुला कां बरं झाली नाहीं ?

**अरविंद :** ( रागानें ) तुला कां त्याची पंचाईत ?

**लिली :** ( समजावून ) तसं नाहीं रे ! पण जरा ऐकशील कीं नाहीं ?

**अरविंद :** तुझं म्हणणं ऐकण्यास माझं मन स्थिर नाहीं.

**लिली :** तें कांहींहि असलं तरी वहिनीवर दोषारोप करून, माझ्या मतें तिच्यावर तूं अन्याय करतो आहेस !

**अरविंद :** न्याय आणि अन्यायाचा निवाडा करायला मी पूर्ण समर्थ आहें. दुसऱ्याच्या सहाय्याची मला मुळींच जरूर नाहीं.

**लिली :** कबूल आहे मला ! पण तुझ्या मस्तकांत पेटलेली आग शांत करण्याकरितां मलाच फुंकर मारली पाहिजे !

**अरविंद :** फुंकर मारल्यानं आग अधिक भडकत असते—समजलं ? ( चिडून ) तूं अगोदर इथून जा पाहूं लिली !

**लिली :** ( आवेगानें ) वहिनीवर पाखंडली जाणारी अन्यायाची आग विझल्याखेरीज, मी इथून जाणं शक्य नाहीं !

**बीना :** ती आग आतां विझणं शक्य नाहीं लिलीताई !

**अरविंद :** आणि ती आग विझविण्याचा जो प्रयत्न करील, त्याची त्या आगीमध्यें जळून राख झाल्याशिवाय राहाणार नाहीं ! ! म्हणून म्हणतों लिली, तूं इथून जा ! जा म्हणतों ना !

**लिली :** तुझ्यापुढं नाईलाज आहे माझा. जातें तर मी—( नाईलाजानें आंत जाते ).

**बीना :** लिलीताई...

**अरविंद :** कशाला ओरडते आहेस तिच्या नांवानं ? आकाश फाटल्यानंतर ठिगळं लावण्याचं नाटक करून दाखवूं नकोस. तें नाटक रंगभूमीवर कधींहि रंगणार नाहीं !

**बीना :** रंगभूमीवर रंगलं नाहीं तरी माझ्या कर्मभूमीवर रंगलं आहे ना तें ?

**अरविंद :** कारण लेखिकेनं आपल्या जीवनांतले प्रसंग नाट्यमय रंगवले आहेत ना !

**बीना :** अरविंद, बोलण्यानं बोलणं वाढतं. मी तुमची सर्वस्वी अपराधी आहें, हें मला मान्य आहे. मी जरी आरोपी असलें, तरी तुम्हीं माझ्या बाजूचे वकील होऊन माझी कैफियत ऐकण्याचा प्रयत्न केलात, तर न्यायमंदिरांत न्यायाचा वांटा उचलून देत असतांना, मी निर्दोषी असल्याचं तुम्हांला आढळून येईल !

**अरविंद :** तुझी कैफियत मला ऐकायची नाहीं. खोट्या न्यायासाठीं झगडून कोर्टाच्या आवारांत यशाची मालिका घालून, स्वतःची तुंबडी भरणारा मी कांहीं धंदेवाईक वकील नाहीं. माझा न्याय एकच कीं निरनिराळ्या तरुणांना फसवून, त्यांची प्रेमसंपदा लुटणारी तूं एक दरोडेखोर आहेस !!

**बीना :** ( चिडून ) मी दरोडेखोर नाहीं, तर एखाद्या फुलाप्रमाणें माझ्या प्रीतीचा सुगंध लुटून, क्षणांत त्या फुलाच्या पाकळ्या सैरावैरा फेकून देणारे तुम्ही खरेखुरे दरोडेखोर आहांत !

**अरविंद :** ( संतप्त होऊन ) बीना–( तिच्या श्रीमुखांत मारण्याकरितां हात उगारतो. पण नरेन आंतून प्रवेशून त्याचा हात धरतो. )

**नरेन :** अरुदादा, हात मागं घे !

**बीना :** ( आवेशानें ) कशाला त्यांना हात मागं घ्यायला लावलांत ? लग्नाअगोदर माझ्या प्रत्येक शब्दावर त्यांचा विश्वास होता आणि केवळ राजनं दिलेल्या रुमालामुळें त्यांचा विश्वास ढळला गेला आहे. नरेनभाऊ तुमच्या भावाला जरा मनाशीं विचार करायला शिकवा. जिच्या जीवनाच्या मातीचं त्यांनीं सोनं केलं आहे, ती स्त्री लग्नानंतर, अवघ्या पंधरावीस मिनिटांत आपल्या उपकारकर्त्याच्या प्रेमाची प्रतारणा करील का ? आणि तें जर शक्य असेल तर त्याच्यामागचा इतिहास काय आहे तो समजावून घेणं हें त्यांचं आद्य कर्तव्य नाहीं का ?

**नरेन :** हो पण हा प्रकार तरी काय आहे ?

**बीना :** मी तुमच्या भावाच्या गळ्याला नख लावलं आहे !

**अरविंद :** ( अधिक चिडून ) नुसतंच नख लावलं नाहींस तर माझा केसानं गळा कापला आहेस. असा माझा विश्वासघात करशील, हें जर मला पूर्वीच कळलं असतं तर समाजबंधनांना लाथाडून सुधारणेच्या दौऱ्यावर निघालेला माझा मोर्चा, तुझ्याशीं विवाहबद्ध होण्यापूर्वीच मी मागं फिरविला

असता. विश्वासाच्या दोरीनं अविश्वासाचा फांस माझ्या गळ्याला लावणारी, तूं एक विश्वासघातकी स्त्री आहेस.

**नरेन :** अरुदादा, कुणाला काय बोलतो आहेस ?

**अरविंद :** तुझ्या वहिनीला. मी नागपूरहून इथं यायला तयार नसतांना देखील हिनं मला इथं सक्तीनं यायला लावलं आहे. म्हणे ' तुमच्या वडिलांचा आशिर्वाद मिळाल्याखेरीज आपण लग्न करायचं नाहीं '. आबासाहेबांचं नांव सांगून तिला इथं राजची मुलाखत घ्यायची होती, त्याच्याकडून प्रेमाची भेट मिळवावयाची होती.

**वीना :** ( शांतपणें ) अरविंद, मनाचा त्रागा करून घेण्यापेक्षां, माझी एक कळकळीची विनंति ऐकता का ? ज्या हातांनीं तुम्ही माझ्या कपाळीं कुंकुमातिलक लावलात, ज्या हातांनीं मंगळसूत्राची काळी पोत माझ्या गळ्यांत बांधलीत, त्याच हातांनीं माझा गळा दाबा !

**नरेन** ( आवंढा गिळून ) वहिनी !

**वीना :** थांबा नरेनभाऊ ! मरण्यापूर्वी सारं कांही मला अरविंदांना समजावून सांगूं दे. अरविंद, मरतांना मी तुमचा जास्त वेळ घेणार नाहीं. तुम्ही माझा गळा दाबीत असतांना, " परमेश्वरा, माझ्या अरविंदांना दीर्घायुष्य लाभूं दे रे " एवढेच शब्द उच्चारून मी माझे डोळे कायमचे मिटून घेईन ! ( अरविंद व नरेनचें हृदय भरून येतें.) विहंगाप्रमाणें असणारा माझा प्राण, देहाच्या पिंजऱ्यांतून उडून आसमंतांत विलीन झाल्यानंतर, तुम्हीं अश्रूंच्या रूपानं माझ्या निश्चल देहाला स्नान घालाल... मनांतल्या मनांत माझं प्रेमपूजन कराल... नंतर माझा देह तिरडीवर टाकून माझी तिरडी बांधाल... तिरडीवर सुगंधी फुलांच्या माळा घालून तिला सजवाल !

**नरेन :** ( असहाय्यतेनें ) वहिनी !

**वीना :** पण नरेनभाऊ, धवल पुष्पांच्या माळा माझ्यासाठीं खरेदी करा हं. धवल वस्त्रांवर धवल पुष्पांच्या माळा घातल्यानं मी पांढरीशुभ्र दिसेन ! ( तिच्या डोळ्यांतून अश्रू गळतात. ) आणि अरविंद, अबीर, गुलाल, पिंजर खरेदी करून पैसे खर्च करण्यापेक्षां, माझी रंगाची पेटी मी बरोबर आणली आहे ना, तिच्यांतील रंग पाण्याऐवजीं तुमच्या अश्रूंत मिसळून माझी तिरडी रंगीबेरंगी बनवा आणि कदाचित् माझ्या मरणाचं तुम्हांला दुःख झालंच तर

डोळ्यांतील अश्रु पुसण्यासाठीं, राजनं मला दिलेला रुमाल तुमच्याजवळ आहे ना—त्याचा उपयोग करा !

**अरविंद :** ( आवेगानें ) बीना—मी तुझा अपराधी आहें. मला क्षमा कर बीना—( तिचे पाय धरतो—ती त्याला उठवते ).

**बीना :** उठा अरविंद ! माझ्यापासून दूर व्हा. माझ्या पायां पडण्यास मी कुणी देवता नाहीं. आणि नरेनभाऊ, माझं सारं सांगणं लक्षांत आलं आहे ना ?

**नरेन :** ( भारावलेल्या अंतःकरणानें ) पण वहिनी !

**बीना :** काय म्हणतां नरेनभाऊ ? हं हं मी मेल्यानंतर तुमचं नाटक मला पाहायला मिळणार नाहीं, म्हणून तुम्हांला वाईट वाटतं आहे ना ? त्याची तुम्हीं काळजी करूं नका. ज्यावेळीं तुम्हीं पहांटेच्या साखर—झोपेंत तल्लीन झालेले असाल, त्यावेळीं मी तुमच्या स्वप्नांत पांढरे शुभ्र कपडे परिधान करून येईन आणि तुमच्या नाटकाचं परीक्षण तुम्हांला सविस्तर सांगेन...तुमच्या लेखनाचं कौतुक करून तुमची दृष्ट काढीन आणि तुम्हांला शुभाशीर्वाद देऊन पुन्हां मी माझ्या अदृश्य जगांत निघून जाईन !!

**नरेन :** ( अगतिकपणें ) पण वहिनी, अरुदादाला तुझी गरज नसली तरी माझ्या नाट्यकथानकाला साज चढविण्यासाठीं मला तुझी गरज आहे ! माझ्या अपुऱ्या राहिलेल्या नाटकाला, तुझ्या जीवनांतील प्रसंगाची जोड हवी आहे—!!

**बीना :** जरूर मिळेल ! आणि तुम्ही तुमच्या नाटकाचे नांव ‘ सौभाग्य ’ ठेवलं आहांत ना ? तेंच नांव संयुक्तिक आहे !

**नरेन :** सौभाग्य ! सौभाग्य !! विधवेच्या जीवनावर लिहिलेल्या नाटकाला सौभाग्य हेंच नांव योग्य आहे...सौभाग्य हेंच नांव योग्य आहे—( झटकन् निघून माडीवर जातो ).

**बीना :** ( आनंदातिशयानें ) नरेनभाऊ—( झटका येऊन पडणार इतक्यांत ‘ बीना ’ असें म्हणून अरविंद तिला सांवरतो ).

( पडदा पडतो )

# ३

[ **स्थळ :** पहिल्या अंकाचेंच. वेळ—सकाळीं आठ साडेआठची. आबासाहेब अस्वस्थपणें फिरत असतात. इतक्यांत लिली आंतून चहा घेऊन प्रवेशते ].

**लिली :** चहा आणला आहे आबासाहेब !

**आबा :** ठेव तिथं आणि आंतून माझी काठी व टोपी घेऊन ये ! ( लिली चहाचा कप राऊंड टेबलवर ठेवून, उजव्या बाजूच्या खोलींतून काठी, टोपी घेऊन येते. तेवढ्या वेळांत आबासाहेब चहा पितात. नंतर लिली कप घेऊन आंत जाते. आबासाहेब बाहेर जाणार इतक्यांत बाहेरून दामुअण्णा प्रवेशतात. दामुअण्णा—वय पन्नास वर्षे. स्वभाव—धांदरट. )

**अण्णा :** नमस्ते—नमस्ते आबासाहेब ! एका महत्त्वाच्या कामाकरितां आलों होतों—पण तुम्ही तर बाहेर जाण्याच्या तयारींत दिसताहांत—( बसतो ).

**आबा :** ( करारीपणें ) होय. आतां मला तुमच्याबरोबर बोलायला जास्त वेळ नाहीं.

**अण्णा :** अहो, पण माझं कमी वेळांत जास्त बोलणं आहे.

**आबा :** काय काम आहे तुमचं ? बोलून टाका—मला वेळ होतो आहे ! ( बसतो )

**अण्णा :** मी तुमच्या लिलीला माझ्या राजनसाठीं मागणी घालायला आलों आहें. अहो, लिलीचं लग्न आतां व्हायलाच पाहिजे.

**आबा :** उपवर झालेल्या मुलीचं लग्न करून, तिला संसाराच्या राज्याची राणी बनवण्याएवढी अक्कल माझ्या डोक्यांत शिल्लक आहे ! पण आपल्या चिरंजीवाबरोबर तिची लग्नगांठ बांधण्याची शकल लढवून, माझ्या अकलेचे तारे तोडून मला मूर्खपणाचं प्रदर्शन मांडायचं नाहीं—( उठतो

**अण्णा :** कां ! काय झालं आहे माझ्या राजला ? अहो, पुढल्याच वर्षी बी.ए.ला बसणार आहे तो !

**आबा :** बी. ए. होऊन बेकार राहाण्याचीं लक्षणें आहेत त्याचीं. कुणा-बरोबर कसं बोलावं हें कळण्याएवढी अक्कल तरी आहे का तुमच्या राजला ? नुसती छानछुकी करून लोकांच्या मुलींच्या मागें गोंडा घोळण्यापलिकडे, त्यानं शिक्षणाचा दुसरा कांहीं चांगला उपयोग केला आहे का ?

**अण्णा :** त्याला कशाला दोष देताहांत ? खरं म्हणजे तुमच्या लिलीनंच प्रीतीच्या गोफणींतील खड्यानं त्याला गारद केलं आहे. उठतां, बसतां, खातां, पितां सारखा ' लिली – लिली ' असा आक्रोश करून विव्हळत असतो तो ! अहो, घरांतील मांजरीचं नांव देखील ' लिली ' असं ठेवलं आहे त्यानं !

**आबा :** माझ्या मुलीनं तुमच्या मुलाला प्रेमांत पकडण्याऐवजीं, तुमच्या मुलानंच तिला नानातऱ्हेचीं आमिषं दाखवून आपल्या प्रीतीचं वेड लावलं आहे.

**अण्णा :** तुम्ही पाहिजे तर तसं म्हणा, पण स्वानुभवावरून मी इतकंच म्हणेन कीं एखादा भपकेबाज तरुण दिसला, कीं त्याला मोहजालांत पकडून कसं चीत करायचं, ही विद्या स्त्रियानांच साध्य झाली आहे. अहो, माझ्या लग्नापूर्वीची गोष्ट आहे. मी खोताच्या वाडींत राहात असतांना, मला नेहमीं ' दाम्या– ए दाम्या ' अशी हांक मारून नाक मुरडणाऱ्या पोरी, मी ज्या दिवशीं कडक इस्त्रीचे कपडे घालून फिरायचा त्या दिवशीं ' दामोदरपंत–अहो दामोदरपंत, जरा थांबा ना ' अशी लाडीक हांक मारून थांबवायला कमी करायच्या नाहींत.

**आबा :** तुम्ही वाचीत असलेल्या अनुभवाची यादी मला मुळींच ऐकायची इच्छा नाहीं. माझं तुम्हांला स्पष्ट सांगणं आहे, कीं तुमच्या राजबरोबर माझ्या लिलीचं लग्न होणं शक्य नाहीं ! तुमच्यासारख्या अप्रतिष्ठित माणसाच्या मुलाबरोबर, माझ्या मुलीचं लग्न लावणं माझ्या मनाला मुळींच पटत नाहीं !!

**अण्णा :** (चिडून उठतात ) मी अप्रतिष्ठित काय ? आबासाहेब, स्वतःच्या पायाखालीं काय जळतं आहे तें अगोदर ताडून पाहा आणि नंतर लोकांना उपदेशामृताचे डोस पाजा. ' लोकां शिकवे ब्रह्मज्ञान आणि आपण कोरडे पाषाण ' अशी तुमची स्वतःची परिस्थिति आहे. सारं कांहीं मला ठाऊक आहे. म्हटलं ठिणगी उडाल्यानंतर आग पेटण्यास जास्त वेळ लागत नाहीं !

**आबा :** आणि पेटलेली आग विझविण्यास मलाहि वेळ लागणार नाहीं ! ह्यापलिकडे मला तुम्हांला जास्त कांहीं सांगायचं नाहीं. मला जायला वेळ होतो आहे ! ( पुटपुटत बाहेर जातात. दामुअण्णा रागीट मुद्रेनें त्यांच्याकडे पाहतात. इतक्यांत लिली आंतून प्रवेशून त्यांना हांक मारते. )

**लिली :** अण्णा, कधीं आलेत अण्णा ?

**अण्णा :** थोड्या वेळापूर्वीच !

**लिली :** काकू कशा आहेत ? आतां बरी आहे ना काकूंची प्रकृति ?

**अण्णा :** हो ठीक आहे. राजनं सांगितलं नाहीं तुला ?

**लिली :** नाहीं, मी एकदां त्याला काकूंच्या प्रकृतिसंबंधीं विचारलं, त्यावर तो म्हणाला, " मला काय विचारतेस ? पाहिजे तर तूंच जाऊन पहा ना ! "

**अण्णा :** ( थट्टेनें ) अग, मग यायचं कीं घरीं. लग्न आधींपासून सासूची एवढी कांहीं भीति बाळगायला नको !

**लिली :** पण अण्णा–

**अण्णा :** काय म्हणतेस ? बोल ना !

**लिली :** ( आवंढा गिळून ) आबासाहेब माझं लग्न राजबरोबर करायला तयार नाहींत. माझं लग्न जवळजवळ त्यानीं जुळवल्यासारखं आहे.

**अण्णा :** घाबरूं नकोस तूं बेटा ! आबासाहेबांनीं जरी आकाशपाताळ एक केलं तरी तुझं लग्न राजबरोबरच होईल !!

**लिली :** ( आनंदानें ) खरंच अण्णा ?

**अण्णा :** होय बेटा ! तूं ह्या दामुअण्णाचीच सून होणार आहेस !! ( हंसतो. )

**लिली :** ( हुरळून ) माझी थट्टा तर करीत नाहीं ना तुम्हीं अण्णा ?

**अण्णा :** वेडे, माझं बोलणं थट्टेवारी न्यायला मीं थोडाच सिनेसृष्टींतील दामुअण्णा मालवणकर आहें ?–( दोघं एकाच वेळीं हंसतात ) नरेन कुठं गेला आहे ? माझं त्याच्याकडे महत्त्वाचं काम होतं !

**लिली :** बाहेर गेला आहे तो ! आज त्याचं नाटक आहे ना, त्या गडबडींत आहे तो. येईल आतां एवढ्यांत. हो, पण तुम्हीं मघांपासून उभे आहांत ! बसा ना. मी चहा करतें.

**अण्णा :** आतां चहा नको, ( खुर्चीवर बसतो ) तूं चहा पाजून माझं तोंड गोड करण्याऐवजीं मींच तुझं तोंड गोड करतों. थांब हं–( खिशांतून चॉकलेटस् काढून तिला देतो ) हीं चॉकलेटस् घे. ( ती घेते ) अग खा ना. नव्या नवरीसारखी लाजतेस काय ?

**लिली :** ( लाजून ) बरं बाई खातें–( खाऊं लागते. अण्णा हंसतात. इतक्यांत बाहेरून नरेन शीळ घालीत प्रवेशतो. लिलीकडे लक्ष जाऊन. )

**नरेन :** चोरून चोरून काय खातेस ग ?

**लिली :** तुला काय करायचं आहे ?

**नरेन :** ( लक्ष जाऊन ) अण्णा, कधीं आलेत ?

**अण्णा :** ( त्याला जवळ बसवून ) ये नरेन ! अरे तुझीच वाट पहात होतों मी.

**नरेन :** हो पण अण्णा, ह्या तुमच्या भावी सूनबाईला काय खायला दिलं आहांत ? लग्नाअगोदर फाजील लाड पुरवूं नका, नाहींतर तुमच्या डोक्यावर चढेल ती !

**अण्णा :** माझ्याच डोक्यावर नव्हे, तर आम्हां दोघां नवराबायकोच्या डोक्यावर चढली तरी चालेल ! एकुलत्या एक सुनेचे लाड सासू सासऱ्यानं पुरवायचे नाहींत, तर काय तिच्या नवऱ्यानें पुरवायचे ? ( लिली लाजते ) लाजूं नकोस तूं बेटा. त्यांतलं एक चॉकलेट नरेनला दे पाहूं.

**लिली :** मी नाहीं देणार ?

**नरेन :** कुणा लेकाला पाहिजे आहे ? मला मुळीं चॉकलेट चघळणं आवडतच नाहीं.

**लिली :** ( नरेनला खिजवून ) कोल्ह्याला द्राक्षं मिळालीं नाहींत म्हणजे तीं त्याला आंबट वाटतात. नाहीं का हो अण्णा ? ( अण्णा व ती हंसतात )

**नरेन :** तुमची सून फार पुढं गेलेली दिसते आहे अण्णा ! जाऊं दे, पण काकूंची प्रकृति काय म्हणते आहे ?

**अण्णा :** म्हणजे राजनं तुला देखील सांगितलं नाहीं ?

**नरेन :** राज एक क्षणभर थांबून माझ्याशीं बोलेल तेव्हां ना ? इथं आला आणि ही लैला भेटली कीं त्या मजनूला आम्हां सर्वांचा विसर पडतो.

**लिली :** चल ! कांहींतरीच सांगूं नकोस अण्णांना !

**अण्णा :** तो काय खोटं सांगतो आहे ? अग, तुम्हां दोघांचं प्रेमच मुळीं अजब आहे. खरं सांग गिरगांव चौपाटीला वाळूंत बसून भेळपुरी तुम्हीं रोज खातां कीं नाहीं ? अगदीं खरं सांगायचं हं !

**लिली :** इश्श ! ( लाजते )

**अण्णा :** अग, कशाला उगाच नाक मुरडतेस ?

**लिली :** अण्णा–( लाजून आंत पळते. नरेन, अण्णा हंसतात ).

**अण्णा :** हो पण अरविंद कुठं गेला आहे ?

**नरेन :** अरुदादाचं व आबासाहेबांचं काल सकाळीं कडाक्याचं भांडण होऊन अरुदादा रागानं घराबाहेर पडला आहे.

**अण्णा :** आणि तुझी वहिनी कुठं आहे ?

**नरेन :** ती इथंच आहे. कालपासून सारखी अश्रू ढाळीत बसली आहे. अरुदादानं बीना वहिनी बरोबर लग्न करून घराण्याला कलंक लावला आहे, असं आबासाहेबांचं म्हणणं आहे.

**अण्णा :** खरं म्हणजे अरविंदानं एक महान दिव्य केलं आहे !

**नरेन :** पण तें आबासाहेबांना पटलं पाहिजे ना !

**अण्णा :** त्यांच्यासारख्या हेकेखोर माणसाला ह्या गोष्टी सांगून पटणार नाहींत. जशास तसं ह्या न्यायानं वागवून, त्यांना ह्या गोष्टी पटवून दिल्या पाहिजेत. ( विषय बदलून खोंचकपणें ) जाऊं दे नरेन ! पण तूं स्वतःच्या जीवनाबद्दल कधीं विचार केला आहेस का ? लेखणीच्या साह्यानं मानवी जीवनाचं चित्र हुबेहुब रंगविणारा नाटककार, आपल्या जीवन नाटकाचा विचार करूं शकत नाहीं, ह्या गोष्टींचंच मला राहून राहून आश्चर्य वाटत आहे.

**नरेन :** ( निराशेनें ) माझं जीवन अर्थशून्य आहे. त्याच्यांत पुष्कळ उद्गारचिन्हं आहेत ! माझ्या जीवनाचा मी जर सखोल विचार करूं लागलों,

तर सर्वत्र प्रश्नचिन्हं भेसूर मुद्रेनं माझ्यासमोर उभीं रहातात. एकाहि चिन्हाचं उत्तर देण्यास मी समर्थ नसल्यामुळें, माझ्या जीवनाला जर पूर्णविराम मिळेल तर फार बरं होईल, असं माझ्या मनाला वाटतं अण्णा !

**अण्णा :** निराश मनानं तूं जर मानवीं जीवन साफल्याचा पल्ला गांठण्याचं ठरवलंस, तर तुला तें शक्य होणार नाहीं. जीवनोद्धारासाठीं खंबीर मनानंच प्रयत्न करायला हवा.

**नरेन :** " जिच्या हातीं पाळण्याची दोरी, ती जग उद्धारी " अशी म्हण रूढ आहे. पण माझ्या पाळण्याची दोरी अर्धवट सोडून, माझी आई जर मला टाकून स्वर्गमंदिरांत गेली आहे, तिथं माझा जीवनोद्धार होणार कसा ?

**अण्णा :** ( खोंचकपणें ) कोण म्हणतो तुझी आई मेली आहे म्हणून ?

**नरेन :** ( आश्चर्यानें ) म्हणजे—माझी आई जिवंत आहे ?

**अण्णा :** होय. तुझी आई जिवंत आहे !

**नरेन :** ( चिडून ) तर मग इतक्या दिवसांत ती मला भेटायला कां आली नाहीं ? तिला मातेचं हृदय नाहीं कीं तिनं तें कापून—घडी घालून कुठल्या पेटाऱ्यांत जपून ठेवलं आहे ?

**अण्णा :** ती तुला न भेटण्याचं तसंच एक महत्त्वाचं कारण आहे. ती तुला ओळखते. लांबूनच तुझ्यावर माया करते. तिचा अंतरात्मा रात्रंदिवस तुझ्या-भोवतीं घुटमळत असतो. तिच्या मंगल मातृत्वाची तुला कल्पना नाहीं नरेन !

**नरेन :** मला एवढीच कल्पना आहे कीं तिला आईचं हृदय नाहीं, तर पत्थराचं भावनाशून्य हृदय आहे. हो, पण माझी आई जिवंत आहे, हें तरी सत्य आहे ना ?

**अण्णा :** होय नरेन. स्वतःला प्रतिष्ठित समजणाऱ्या एका गृहस्थानं तिला तिच्या तारुण्यांत फसवून, तुला जन्माला घातलं आहे ! तिचं जीवन मातीमोल केलं आहे ! मरण्यापूर्वींच तिला मातींत गाडलं आहे ! तरी देखील समाजाच्या ठोकरी खात खात ती बिचारी अजूनपर्यंत जगली आहे !!

**नरेन :** ( अधीरतेनं ) कुठं आहे माझी आई अण्णा ? मला तिला भेटायचं आहे ! 'आई' अशी प्रेमळ हांक मारून मला तिला कडकडून

मिठी मारायची आहे! 'आई मिळाली—आई मिळाली' असा मला जयघोष करायचा आहे!! (दांत ओठ चावून) आणि 'चांडाळणी' अशी हांक मारून मला तिचा गळा दाबायचा आहे!

**अण्णा :** (असहाय्यतेनें) नरेन—

**नरेन :** चला अण्णा, मला तिच्याकडे घेऊन चला. त्या चांडाळणीच्या जहरी डोळ्यांचीं बुबुळं मला माझ्या अणकुचीदार नखांनीं बाहेर काढायचीं आहेत. माझ्या आयुष्यांतील एक महत्त्वाचा दिवस मोठ्या थाटामाटानें साजरा करायचा आहे!!

**अण्णा :** नरेन, तुझी आई तुला भेटण्यासारखी आहे! पण तूं तिची ओळख करून न घेणें, हेंच माझ्या दृष्टीनं चांगलं आहे.

**नरेन :** (आवेगानें) पण मला तिचा खून करून सुडाचं सात्त्विक समाधान मिळवायचं आहे. तिच्या रक्ताच्या थारोळ्यांत न्हाऊन निघायचं आहे! चला, (क्रूरतेनें) मला जन्म देतांना ज्या हातानीं तिनं परपुरुषाला भावनेच्या अहारी जाऊन मिठी मारली असेल, ते तिचे हात मला फरशीच्या घावानीं तोडून, बुंधापासून तुटल्या जाणाऱ्या झाडाप्रमाणें शरिरापासून दूर करायचे आहेत!

**अण्णा :** नरेन!

**नरेन :** (संतापानें) ज्या ओंठानीं तिनें चुंबनाचा वर्षाव परपुरुषावर केला असेल, त्या ओठांचीं सालपटं मला सोलून काढायचीं आहेत! ज्या गालांवर तिनें परपुरुषाकडून चुंबनाचा वर्षाव करून घेतला असेल, त्या गालांतून मला तापलेली सळई आरपार काढायची आहे!!

**अण्णा :** शांत हो नरेन—शांत हो! (त्याच्या पाठीवरून हात फिरवतात)

**नरेन :** (बेभान होऊन) नाहीं अण्णा; नाहीं—शक्य नाहीं तें! माझा जीवनवृक्ष वाढण्याकरितां त्या चांडाळणीनं ज्या स्तनांतून दुधाच्या धारा माझ्या तोंडांत सोडल्या असतील, त्याच स्तनांतून रक्ताच्या धारा मला सोडून दाखवा-वयाच्या आहेत! तिच्या मांसाचा चिखल मला माझ्या पायाखालीं तुडवायचा आहे! ज्या केसांच्या मादक सुगंधानं तिनं परपुरुषाला भुरळ घातली असेल, त्या केसांचा दोरीप्रमाणें उपयोग करून मला तिला झाडावर टांगून, 'पाप टांगलं गेलं आहे' असं जगाला ओरडून सांगायचं आहे!! (कळवळून) म्हणून म्हणतों अण्णा, कुठं आहे माझी आई?...कुठं आहे माझी आई? (ढळढळां रडतो. अण्णा त्याला समजावतात.)

**अण्णा :** ( धोतराच्या सोग्यानें स्वतःचे डोळे पुशीत ) शांत हो नरेन, शांत हो ! तुझ्या माऊलीला तूं दोष देऊं नकोस. ती निर्दोष आहे रे !!

**नरेन :** ( चेवानें ) ती निर्दोष आहे अं ! स्वतःच्या उदरांत नऊ महिने पापाचा गोळा जीवापलीकडे सांभाळून अखेरीस त्याच पापाच्या गोळ्याला कागदाची होडी समजून गटाराच्या पाण्यांत सोडून देणारी ती कुल्टा निर्दोष आहे ? तिला म्हणावं हा पापाचा गोळा चालता बोलता झाला आहे. तिच्या पापाचा जाब तिला विचारायला जाणार आहे तो. सरळपणानं उत्तर दिलं तर ठीक, नाहींतर तिच्या मानेला पीळ देवून, उसाच्या चरकांतून बाहेर पडणाऱ्या रसाप्रमाणें तिच्या मानेंतून रक्ताची धार चालू करतों !

**अण्णा :** ( रोखून ) नरेन, कुणाला काय बोलतो आहेस ? जिनं तुला जन्माला घातलं त्या माऊलीची तूं विटंबना चालविली आहेस ना ?

**नरेन :** पण त्या माऊलीनं परपुरुषाची सांवली घेतांना आपल्या मृत पतीची आठवण कशी गाडून टाकली होती ? कुणाबरोबर संबंध होता त्या कुलटेचा ?

**अण्णा :** सारं कांहीं मला तुला समजावून सांगायचं आहे ! पण त्या अगोदर तुला बजावून सांगायचं आहे, कीं, तुझी आई दोषी नाहीं.

**नरेन :** तर मग तिच्या पोटीं जन्माला येणारा हा पापाचा गोळा दोषी आहे असंच ना ? अण्णा, ह्यापूर्वींच तुम्हीं मला माझ्या जीवनाची कटु कहाणी कां सांगितली नाहींत ?

**अण्णा :** ह्यापूर्वींच मला ती सांगतां आली असती, पण तुला दुखवायचा माझा विचार नव्हता. तुला जन्म देणारी व्यक्ती खोट्या प्रतिष्ठेचा टेंभा मिरवून जें नाटक लोकांना करून दाखविते आहे, त्या खोट्या प्रतिष्ठेचा फुगा मला आज फोडायचा आहे, आणि तो फोडण्यासाठीं मला तुझा उपयोग करायचा आहे.

**नरेन :** तुमच्या मनाला वाटेल तसा माझा उपयोग करा. माझ्या आईचा शोध लावण्यासाठीं माझा बळी पडला तरी त्याची मला पर्वा नाहीं ! पण मी मरतां मरतां तरी तिचं मंगल दर्शन मला घडूं दे ( पुन्हां अधिरतेनें, ) म्हणून म्हणतों अण्णा, कुठं आहे माझी आई ? कुठं आहे माझ्या मातृत्वाचा खजिना ? आई ऽऽ आई ऽऽऽ ( ओरडतो ).

**अण्णा :** मातेच्या नांवानं असा आक्रोश करूं नकोस. तुझी आई कुठं आहे, सध्यां काय करते ती, सारं कांहीं समजावून सांगतों. पण इथं नाहीं. माझ्याबरोबर बाहेर चल !

**नरेन :** ( रुद्ध स्वरांत ) माझ्या आईच्या भेटीसाठीं जगाच्या पाठीवर कुठंहि येण्याची माझी तयारी आहे. तिच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करून अन्न म्हणून कांचेचे तुकडे खाण्याची, पाणी म्हणून विषप्राशन करण्याची माझ्यावर पाळी आली, तरी देखील माझी तयारी आहे. पण अण्णा, एका अटीवर येईन मी !

**अण्णा :** कोणती अट नरेन ?

**नरेन :** माझी आई निर्दोष असल्याचं जर मला पटलं, तर तिची विटंबना करणाऱ्या माझ्या जिभेचा शेंडा तुम्हांला तिच्या समक्ष कापावा लागेल आणि ती जर दोषी असल्याचं कळलं तर तिचं मातृहृदय माझ्या हातून कापलं जाईल !

**अण्णा :** असं वेड्यासारखं बडबडूं नये नरेन. चल ! चल पाहूं तूं माझ्याबरोबर बाहेर ! ( नरेनला घेऊन बाहेर जातात. नंतर बीना आंतून दुःखानें गाणें म्हणत प्रवेशते )

कुठवर साहूं सांग साजणा
मी नाहीं का तुझी प्रियतमा
गृहकलहानें मनीं त्रागूनी
मम हृदयाचीं शकलें पाडुनी
मंगलसदना जासी त्यजुनी
बरा नव्हे रे अविचार हा

( पद संपल्यानंतर कोच अगर खुर्चीवर अश्रू ढाळीत बसते. आंतून लिली नरेनला हांक मारीत प्रवेशते. )

**लिली :** भावड्या ! अरे ए भावड्या–एवढ्यांत कुठं गेला बरं ? ( पाहून ) वहिनी, पुन्हां तूं अश्रू ढाळायला सुरुवात केली आहेस ना ? अग, अरुदादा परत आल्याशिवाय रहाणार नाहीं !

**बीना :** लिलीताई, अरविंद माझ्यापासून एक क्षणभर देखील दूर राहूं शकणार नाहींत, याबद्दल माझं मन मला ग्वाही देत आहे ! पण काल रात्रीं

मला पडलेलं भयंकर स्वप्न सारखं पछाडतं आहे. त्या स्वप्नांतील ते हृदयभेदक देखावे माझ्या नजरेसमोर उभे राहिले कीं मी भयाकूल होतें...माझ्या उराचे टांके तुटले जातात आणि अश्रूंचा पूर माझ्या डोळ्यावाटें वाहू लागतो.

**लिली :** स्वप्न नेहमींच खरीं होतात का ? स्वप्न म्हणजे ! निद्रावस्थेंत चाललेला आपल्या मनाचा खेळ असतो !

**वीना :** तो जरी मनाचा खेळ असला तरी भल्या पहांटें पडलेलं स्वप्न बऱ्याच अंशीं खरं ठरतं. ( भयाकुल होऊन ) माझं स्वप्न जर खरं ठरलं तर मी पुन्हां सौभाग्याच्या कड्यावरून कोसळून, वैधव्याच्या खोल दरींत कोसळेन, लिलाताई !

**लिली :** वहिनी, यत्किंचित स्वप्नभयानं तूं असं वेड कां पांघरून घेतलं आहेस ? पहांटेचं स्वप्न खरं ठरतं ही तुझी भ्रामक कल्पना आहे !

**वीना :** कल्पना जरी भ्रामक असली तरी स्वप्नांतील प्रसंगाचं, विविध रंगाचं चित्र मला ठळक दिसतं आहे ! कारण तें चित्र माझ्या दुर्दैवाच्या कुंचल्यानं रंगविलेलं आहे.

**लिली :** त्या चित्रावर सुविचाराचं पाणी सोड, म्हणजे त्या चित्राचे सारे रंग आपोआप धुवून जातील !

**वीना :** ( निराशेनें ) तरी पण चित्राची मूळ आकृति पुसली जाणार नाहीं ! किती भयंकर स्वप्न आहे म्हणून सांगूं तुम्हांला ... ( सांगूं लागते ) काल सकाळीं अरविंदांनीं रागानं घर सोडलं ... विचारमग्न स्थितींत रस्त्यावरून चालत असतांना, कसली तरी टोंचणी त्यांच्या मनाला बोंचत होती... रस्त्यानं चालतांना आजूबाजूला त्यांचं मुळींच लक्ष नव्हतं...( भेदरून ) इतक्यांत त्यांच्या पाठीमागून वेगानं धावणारी मोटारगाडी आली आणि ... आणि ती आपलीं चाकं अरविंदांच्या शरिरावरून घेऊन, धुळीचे लोट उडवीत दूर...दूर निघून गेली—( स्फुंदूं लागते ).

**लिली :** वहिनी, काय विचित्र बरळतेस हें ? ( इतक्यांत राज बाहेरून प्रवेशून दरवाजामध्यें शांत उभा राहातो. त्याच्या हातांत ताजें वर्तमानपत्र असतें. )

**बीना :** खरं सांगतें आहे मी लिलीताई ! मला पडलेलं स्वप्न हें असं होतें. ( उद्वेगानें ) लिलीताई, त्या मोटारगाडीच्या इन्जीनची तहान पेट्रोल पिऊन भागली नव्हती, म्हणून का त्यानं अरविंदाचं रक्त प्राशन करून आपल्या आत्म्याची तृप्ति करून घेतली ?

**लिली :** तूं शुद्धीवर नाहींस वहिनी ! अरुदादाच्या प्रेमानं वेडीपिसी होऊन बेभान झाली आहेस !

**बीना :** पण लिलीताई, मला पडलेलं स्वप्न खरं तर होणार नाहीं ना ?

**राज :** ( पुढें होऊन शांतपणें ) तुझं स्वप्न खरं झालं आहे बीना ! तुझ्या म्हणण्याप्रमाणें अरविंद मोटार अपघातांत सांपडला आहे ! !

**लिली :**<br>**बीना :** } ( असहाय्यतेनं ) राज—

**राज :** नाईलाजानें दुःखाची बातमी मला सांगावी लागत आहे !

**लिली :** तुला कुणीं सांगितलं राज ?

**राज :** आजच्या पेपरला बातमी आली आहे ! हा पहा पेपर ! ( लिली पेपर घेऊन वाचते. वाचतां वाचतां पेपर हातांतून गळून खालीं पडतो. )

**बीना :** माझं स्वप्न खरं झालं आहे ना लिलीताई ?

**लिली :** वहिनी, खरंच का ग तूं दुर्दैवी आहेस ?

**बीना :** ( भावनातिरेकानें ) लिलीताई, ( तिच्या खांद्यावर मान टाकून रडूं लागते. राज गंभीर मुद्रेनें उभा असतो ) पहांटेचं स्वप्न खरं होतं याचा प्रत्यय आतां तरी तुम्हांला आला ना लिलीताई ? तें स्वप्न खरं झालं आहे आणि माझ्या संसाराचं स्वप्न भंगलं आहे ! ! ( रडते )

**राज :** बीना, असा शोक करूं नकोस. तशी अरविंदाची प्रकृति ठीक आहे. मला ही बातमी कळतांच मी हॉस्पिटलमध्यें जाऊनच इथं आलों आहें.

**लिली :** ( अधिरतेनें ) खरंच ? पण अरुदादाला जास्त मार तर लागला नाहीं ना ?

**राज :** नाहीं. थोडासा डोक्याला मार लागला आहे. तसा तो शुद्धीवर आहे. मी गेलों त्यावेळीं त्याला गाढ झोंप लागली होती. डॉक्टर म्हणाले, उठवल्यानं त्याला जास्त त्रास होईल ! म्हणून मी तसाच परत

आलों. थोड्या वेळानें मी व नरेन अरविंदाला घेऊन इथं येऊंच कीं ! हो, पण नरेन कुठं गेला आहे ?

**बीना :** मला वाटतं नरेनभाऊ बाहेर गेले आहेत. ते मागाहून हॉस्पीटल-मध्यें येतील. पण राज, त्या अगोदर अरविंदांना भेटायला मला घेऊन चल. मला त्यांना डोळे भरून पाहूं दे. ( कळवळ्यानें ) मला माझे अरविंद हवे आहेत—( त्याचवेळीं बाहेरून नरेन वेडगळपणं बडबडत प्रवेशतो )

**नरेन :** मला माझी आई हवी आहे !

**राज :** नरेन, कुठं गेला होतास तूं ?

**नरेन :** माझ्या आईचा शोध लावायला ! !

**राज :** असं काय बडबडतोस ?

**लिली :** भावड्या, असं रे काय करतोस ?

**नरेन :** ( भ्रमिष्टाप्रमाणें ) कुठं काय ?...कांहीं नाहीं. उलट आज मी अत्यानंदानें वेडा झालों आहें ! आज माझ्या जन्मदात्रीचा व जन्मदात्याचा—दोघांचाहि एकाचवेळीं मला शोध लागला आहे ! ! सारं रंगीबेरंगी जग मला आनंदानं फुललेलं दिसत आहे !!! ( विचित्र हास्य करतो ).

**बीना :** नरेनभाऊ, आनंदानं तुमचा चेहरा ह्या क्षणीं प्रसन्न झाला असला, तरी दुःखाच्या हादऱ्यानं माझा चेहरा मलूल झाला आहे ! नरेनभाऊ, माझे अरविंद मोटार अपघातांत सांपडले आहेत ! ! ( रडते )

**नरेन :** त्यापेक्षांहि मोठा अपघात माझ्या जीवनांत आज घडला आहे ! माझ्या आईचा आज मला शोध लागला असला, तरी ती बदफैली वर्तनाची बाई असल्याचं कटु सत्य आज मला कळलं आहे ! माझी आई म्हणजे निर-निराळ्या पुरुषांच्या शेजेची सोबतीण आहे ! ! ( आवेगानें ) मी एका वेश्येचा मुलगा आहें ! लिली, राज, बीना वहिनी मी एका वेश्येचा मुलगा आहें......वेश्येचा मुलगा आहें—( झटकन आंत जातो )

**राज :**<br>**बीना :** } नरेन !

**लिली :** ( घाबरून ) राज, तूं आंत जा आणि भावड्याला काय झालंय तें पहा. मला तर कांहीं एक सुचत नाहीं !

**राज :** लिली, असा धीर सोडूं नये. त्याच्या हळव्या मनावर कसला तरी विपरीत परिणाम झालेला असावा. बीना, तुम्हीं दोघी इथंच रहा. मी नरेनची समजूत घालतों ! ( आंत जातो. )

**बीना :** लिलीताई, आजचा हा अशुभ दिवस उगवला कशाला हेंच मला कळत नाहीं !

**लिली :** ( स्फुंदत ) दैव आपली कसोटी पहातं आहे वहिनी ! तूं पण माझ्या भावड्याची समजूत घाल जा. मला तर त्याच्याकडे पहाण्याएवढं देखील धैर्य होत नाहीं.

**बीना :** नरेनभाऊंची तुम्हीं काळजी करूं नका लिलीताई. मी त्यांना समजाविण्याचा प्रयत्न करतें. तुम्हीं इथंच स्वस्थ बसून रहा. उगाच मनावर परिणाम करून घेऊं नका–( आंत जाते. नंतर लिली असहाय्यतेनें गाणें म्हणते ).

भकास जीवन भासे सारें
क्षणोक्षणीं गृहिं उठुनी वादळें
आशादीप मम क्षणांत विझले
जीवनमार्गी खांच खळगे
सांग सांग रे प्रभु वनमाळी
जीवनपथ मी चालूं कसा रे ?

( पद संपतांच कोचावर अश्रू ढाळीत बसते. इतक्यांत आंतून राज प्रवेश करतो. त्याच्या मागोमाग नरेन त्याला हांक मारीत प्रवेश करतो )

**नरेन :** थांब राज, मी देखील तुझ्याबरोबर हॉस्पीटलमध्यें येतों. मला सुद्धां अरुदादाला पहायची आतुरता लागली आहे.

**राज :** हें पहा, तुझी प्रकृति ठीक नाहीं. उगाच तूं त्रास करूं नकोस. अरे अर्ध्या तासांत अरविंदला टॅक्सींतून घेऊन येतों मी. अच्छा–(बाहेर जातो.)

**लिली :** भावड्या, एकाएकीं काय झालंय रे तुला ?

**नरेन :** ( भ्रमिष्ट होऊन ) कोण...कोण तूं ? माझी आई तर नव्हेना ? नाहीं, नाहीं तूं माझी आई नाहींस–तूं माझी कुणींच नाहीं—

**लिली :** भावड्या—( स्फूंदूं लागते )

**बीना :** ( आंतून प्रवेशून ) काय झालं लिलीताई ? आणि नरेनभाऊ, तुम्हीं स्वस्थ झोपायचं टाकून पुन्हां इथं आलेत ना ? चला पाहूं आंत !

**नरेन :** नाहीं बीना वहिनी ! मला बाहेर जायचं आहे ! हें जग कायमचं सोडून जायचं आहे !

**आबा :** ( बाहेरून प्रवेशून ) तर मग थांबला आहेस कशाला ?

**नरेन :** ( तडफतेनें ) तुमच्या नीच कृतीचा जाब विचारायला !

**लिली :** ( घाबरून ) भावड्या, तूं आंत चल पाहूं !

**नरेन :** तूं कोण मला सांगणार ? तुझा काय माझ्याशीं संबंध आहे ? अगोदर तूंच चालती हो माझ्या नजरेसमोरून–चल नीघ–( तिला आंत लोटून देतो. आबासाहेब व बीना त्याच्याकडे विस्मयानें पहातात. )

**आबा :** आज काय झालंय तुला ? तुझा अरुदादा मोटार अपघातांत सांपडला आहे, ही बातमी वर्तमानपत्रांत वाचलीस कीं नाहीं ? ह्या साऱ्या गोष्टीला कोण कारणीभूत आहे ठाऊक आहे ना ? ही तुझी पांढऱ्या पायाची वहिनी !

**नरेन :** त्या बिचारीला कशाला दोष देताहांत ? अरुदादा अपघातांत सांपडायला तुम्हीं स्वतः कारणीभूत आहांत !

**बीना :** नाहीं नरेनभाऊ, आबासाहेबांच्या म्हणण्याप्रमाणें मीच दोषी आहें. माझ्यामुळेंच अरविंदांच्या प्राणावर संकट बेतलं होतं !

**आबा :** ऐक, तुझ्या वहिनीचाच कबुली जबाब ऐक ! आतां अरु पुन्हां घरीं आला, तर हिच्यासह दोघांनाहि घराबाहेर काढतों !

**नरेन :** तुमच्या घराचा दरवाजा त्या दोघांसाठीं बंद केलांत, तरी जगांतले दुसरे दरवाजे कांहीं त्यांच्यासाठीं बंद झालेले नाहींत ! !

**बीना :** नरेनभाऊ, मोठ्या आनंदानं घराबाहेर जाण्यास आम्हीं दोघं तयार होऊं !

**नरेन :** ती वेळ येईल त्यावेळीं पहातां येईल ! वहिनी, कृपा करून ह्या क्षणाला तूं आंत जा पाहूं–

**बीना :** कां बरं ?

**नरेन :** ( दटावून ) मी जा म्हणून सांगतों ना ! (ती निमुटपणें आंत जाते.)

**आबा :** आज तुला झालंय तरी काय ?

**नरेन :** गगनांत मावणार नाहीं एवढा आनंद झाला आहे !

**आबा :** तर मग दुःखाची काजळी कां चेहऱ्याला फांसली आहेस? मला उद्धटपणाचं वर्तन दाखवून खाल्लेल्या घराचे वासे मोजण्याचं धाडस करूं नकोस.

**नरेन :** मला घराचे वासे मोजायचे नाहींत तर माझ्या नाशिबाचे पडलेले उलटे फासे, तुमच्यावर प्रश्नांची बरसात करून सारखे करायचे आहेत ! ( खोंचकपणें ) मी तुम्हांला असं विचारतों कीं अरुदादानं जर बीना वहिनीबरोबर लग्न केलं नसतं तर काय झालं असतं ?

**आबा :** माझ्या प्रतिष्ठित घराण्याला कलंक लागला नसता !

**नरेन :** अस्सं ! पण ऐन तारुण्यांत वैधव्याच्या रखरखीत वाळवंटांतून चालतांना, जर कां बीना वहिनी अनीतीच्या मार्गाला गेली असती, तर त्या गोष्टीला कोण जबाबदार राहिलं असतं !

**आबा :** प्रत्येकाचं दैव हें प्रत्येकाला जबाबदार असतं ?

**नरेन :** तुमच्या दृष्टीनं दैव जबाबदार असेल, पण समाजानं तिला दोषी ठरवलं असतं. ती वाईट मार्गाला कां गेली ह्या गोष्टीचा समाजानं विचार केला नसता ! पण तसं कांहीं घडण्यापूर्वींच अरुदादानं तिला अधोगतीपासून वाचविलं आहे ! तिच्याशीं विवाह करून तिला न्याय मिळवून दिला आहे !!

**आबा :** दिवे लावले आहेत त्यानं !

**नरेन :** ( चिडून ) आणि तुम्हीं एका तरुण विधवेच्या आशेचे दीपक मालवून तिच्या जीवनांत अंधःकार पसरला आहांत ! चंद्राला, माझ्या आईला तुम्हीं माणसांतून उठवून वेश्या बनवली आहांत !! ( आबासाहेब दचकतात ) कां ? आकाशांत बिजली चमकून जावी त्याप्रमाणें आपल्या नजरेची चलबिचल कां झाली ?

**आबा :** ( अपराधी मुद्रेनें ) नरेन—

**नरेन :** खरं सांगा आबासाहेब, नायकीणवाडींतील चंद्रावेश्या ही माझी आई आहे कीं नाहीं ? ( कंठ दाटून ) माझी आई माझ्या लहानपणीं वारली, अशी तुम्हीं माझी समजूत करीत होतां ! पण ती जिवंत असल्याचा शोध आज मला अकल्पितरित्या लागला आहे.

**आबा :** नरेन !

**नरेन :** माझ्या आईचे पति तुमचे परम मित्र होते. त्यांच्या ऐन तारुण्यांत त्यांना मृत्यू येऊन माझी आई निराधार झाली. माहेरचा किंवा सासरचा कुठलाहि आधार नसतांना, स्वतंत्रपणें जीवन कंठीत होती बिचारी. मित्राची पत्नी म्हणून तुम्हीं तिला आर्थिक सहाय्य करीत होतां-( त्राग्यानें ) आणि अखेरीस त्याचा मोबदला घेऊन तुम्हीं केव्हांच मोकळे झाला आहांत ! त्या गरीब गाईच्या शीलावर झडप घालून तुम्हीं तिच्या उदरांत पापाचे अंकुर निर्माण केलेत. म्हणूनच जमिनींतून बाहेर पडणाऱ्या रोपट्याप्रमाणें, नऊ महिन्यानंतर हा पापाचा गोळा जगाच्या समोर उगवला गेला. तुम्हीं त्याचं नांव ' नरेन ' असं ठेवलंत. ' नरेन ' ह्या नांवानंच सारं जग ह्या पापाच्या गोळ्याला ओळखतं आहे ! खरं आहे ना हें आबासाहेब ?

**आबा :** ( हताशतेनें ) कुणीं सांगितलं तुला नरेन ?

**नरेन :** सत्य कधींच दडून रहात नाहीं आबासाहेब ! पापाला वाचा ही फुटतेच. स्वतःच्या मालकीचा पापाचा गोळा म्हणून त्याचं पालन पोषण करण्याची जबाबदारी तुम्ही स्वतःच्या शिरावर घेतलीत—आणि माझ्या आईचा कायमचा त्याग करून तुम्हीं तिला वेश्या बनवलीत ! एका विधवेच्या जीवनाचं मातेरं केलंत !! रस्त्यांत सांपडलेलं अनाथ मूल, असं साऱ्या जगाला सांगून तुम्हीं माझं आतांपर्यंत पालन पोषण केलंत आणि जगाची समजूत पटवलीत अं !

**आबा :** नरेन, खरा इतिहास वेगळा आहे रे ! खरं म्हणजे तुझी आईच ह्या साऱ्या गोष्टीला कारणीभूत आहे.

**नरेन :** ( बजावून ) आबासाहेब-तिच्याबद्दल अवाक्षर उच्चारूं नका, नाहींतर बाप म्हणून न ओळखतां तिच्यावरील अन्यायाचा सूड उगवायला मी कमी करणार नाहीं !! ( रुद्धस्वरांत ) ती एका गृहस्थाबरोबर पुनर्विवाह करण्यास प्रवृत्त झाली असतांना, तिनं तुम्हांला बंधुत्त्वाच्या नात्यानं तुमची संमति विचारली होती, त्यावेळीं तुम्ही तिला समाजाचा बागुलबुवा दाखवून तिच्या उच्च विचारापासून परावृत्त केलंत-आणि त्या बिचारीच्या भोळेपणाचा फायदा घेऊन तुम्हीं आपला कार्यभाग साधून घेतलांत. एकदां का अनीतीच्या

मार्गावरून माणूस चालूं लागला म्हणजे नीतीच्या मार्गावर येणं कठीण जातं. त्याला ती तरी कशी अपवाद असणार ? ( कंठ दाटून ) त्या बिचारीचा पाय घसरला तो कायमचाच ! पोट जाळण्याकरितां बिचारीला वेश्या—व्यवसाय करावा लागला. ( आवेगानें ) आणि त्याच वेश्येचा मी मुलगा आहें. एका यत्किंचित वेश्येचा मुलगा म्हणजे पापाचा गोळा ! ( रडतो ) आबासाहेब—आबासाहेब, कशाला मला जन्माला घातलंत ? निदान जन्म झाल्याबरोबर माझ्या मानेला नख लावायला माझ्या आईला कां सांगितलं नाहींत ? ( आबासाहेबांना गदगदा हालवतो. त्याचवेळीं बीना, लिली आंतून प्रवेशून भयभीत होतात. )

**आबा** : ( पश्चात्तापानें ) नरेन, चुकलों मी ! आयुष्यांत कधींहि सुधारणार नाहीं एवढी मोठी चूक केली आहे मी ! ( धोतराच्या सोग्यानें डोळे पुसतात ).

**नरेन** : लिली, बीनावहिनी, तुम्ही माझे वडील पाहिले आहेत का ? नसतील पाहिलेत तर डोळे फाडफाडून पहा. हाच, हाच तो माझा बाप कीं ज्यानं एका विधवेच्या शीलावर झडप घालून मला जन्माला घातलं आहे !

**बीना** : नरेनभाऊ, असं काय बोलतां ?

**लिली** : काय झालं आबासाहेब !

**नरेन** : माझ्या वडिलांचंहि नांव आबासाहेब आहे लिली ! हेच ते आबासाहेब ! ! स्वतःला सुधारणावादी समजणारे हेच ते तुझे आणि माझे वडील आबासाहेब ! ! !

**लिली** : भावड्या !

**नरेन** : खोटं वाटत असेल तर विचार आबासाहेबांना !

**बीना** : खरं आहे आबासाहेब ?

**आबा** : होय बीना. नरेन माझा मुलगा आहे !

**लिली** : पण त्याची आई——

**नरेन** : नायकीणवाडींत वेश्याव्यवसाय करते आहे. निरनिराळ्या पुरुषांच्या शेजेची सोबतीण आहे ती ! मी तुझा भाऊ नाहीं लिली—तर आबासाहेबांच्या रखेलीचा मुलगा आहें ! ( रडतो. नंतर चिडून ) स्वतःला

सुधारणावादी समजणाऱ्या ह्या आबासाहेबांनीं माझ्या आईला वेश्या बनवली आहे ... वेश्या बनवली आहे...

**आबा :** नरेन !

**नरेन :** ( संतापानें ) चूप ! माणुसकीची पायरी सोडून माझ्या आईचा शीलभंग करणाऱ्या व्यभिचारी माणसा, माझ्या आईवरील सूड उगाविण्यासाठीं मी तुझा आतां प्राणच घेतों. बेहेत्तर मग फांशी गेलों तर— ( झडप घालून आबासाहेबांचा गळा दाबण्याचा प्रयत्न करतो ) लिली, तुझ्या वडिलांचा मी खून करीत आहे !

**लिली :** भावड्या !

**वीना :** नरेनभाऊ–( दोघी त्याला आबासाहेबांपासून दूर करतात ).

**आबा :** ( पश्चात्तापानें ) नरेन, खुशाल गळा दाबून माझा प्राण घे, कारण, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी तुझ्या आईला माणसांतून उठवली आहे !

**नरेन :** नाहीं, नाहीं आबासाहेब, तुमचा खून करून उपकारांचो फेड मी अपकारानीं करणार नाहीं ! कारण तुम्हीं माझे पालनकर्ते आहांत-जन्मदाते आहांत ! ह्या क्षणाला तुमच्यावर मी जे वाक्‌प्रहार केले आहेत, त्याबद्दल मला क्षमा करा आबासाहेब !

**आबा :** नरेन, त्या अगोदर मी तुझे अनंत अपराध केल्याबद्दल तूंच मला क्षमा कर-( नरेनचे पाय धरतो. नरेन उठवतो ).

**नरेन :** आबासाहेब, वाईट वाटून घेऊं नका ! माझ्या जीवनाचं कोडं मला उकलत नव्हतं. माझं जन्मस्थान मला शोधून देखील सांपडत नव्हतं— म्हणून मी एकलकोंड्या स्वभावाचा बनून हातांत लेखणी धरली होती. ( टांक उचलून ) ही लेखणी आजपर्यंत माझी सोबतीण होती. ( कागद उचलून ) हे कागद माझे जीवनसाथी होते आणि म्हणूनच मी वेगळ्या जगांत विहार करीत होतों. ह्या लेखणीच्या साह्यानं ह्या कागदांवर मी जो माझा जीवन इतिहास लिहिला आहे, तो नाटकरूपानं मी पुस्तकांतून प्रकाशित केला आहे. त्या नाटकाचा प्रयोग देखील आजच आहे ! हें पहा त्या नाटकाचं पुस्तक— ( टेबलावरील ' सौभाग्य ' नाटकाचं पुस्तक दाखवतो. )

**सर्वजण :** ( आश्चर्यानें , सौभाग्य ! !

**नरेन :** होय सौभाग्य !-सौभाग्यऽऽऽ( ग्लानी येऊन कोचवर पडतो. सर्वजण ' नरेन ' असा कल्लोळ करून त्याला सांवरण्याचा प्रयत्न करतात. )

**आबा :** ( धांदरटपणें ) जा बीना, पाणी घेऊन ये जा. ( बीना, आंत जाते ).

**लिली :** भावड्या, ए भावड्या ! ( त्याला सावध करण्याचा प्रयत्न करते. बीना आंतून पाण्याचें भांडें आणते. लिली तिच्या हातून भांडें घेते, त्याचवेळीं बाहेरून अरविंदला धरून राज प्रवेश करतो. अरविंदच्या डोक्याची जखम बांधलेली असते. अरविंदला पाहून बीनाचा ऊर दाटून येतो. )

**बीना :** अरविंद–

**अरविंद :** बीना–( तिला जवळ घेतो ).

**बीना :** आतां बरं वाटतं आहे ना अरविंद ?

**अरविंद :** होय, पण हें काय पहातों आहें मी बीना ? ( नरेन-जवळ जातो )

**बीना :** नरेनभाऊंना ग्लानी आली आहे !

**राज :** कां ? काय झालं ?

**लिली :** अरुदादा–माझा भावड्या...( रडूं लागते ).

**अरविंद :** उगी रहा. असं रडूं नये. ( नरेनजवळ बसतो. इतर सर्वजण भयभीत होऊन नरेनकडे पहात असतात ) नरेन–नरेन– ( त्याला हालवतो ).

**नरेन :** ( बडबडतो ) काय म्हणतां आबासाहेब ?...अहो खरं सांगतों आहें मी...अरुदादा माझ्या नाटकाचा नायक व बीनावहिनी माझ्या नाटकाची नायिका आहे...लिलीनं माझ्या नाटकाला संगीत पुरवलं आहे...तर राजनं विनोदाची बाजू संभाळली आहे......पण तुम्हीं–तुम्ही माझ्या नाटकाचे खलनायक आहांत...केवळ तुमच्यामुळेंच माझ्या ' सौभाग्य ' नाट-काचीं ( ? ) पानें रेखाटतां आलीं...समजलं आबासाहेब !

**लिली :** पाहा ना कसा बडबडतो आहे तो !

**राज :** अरविंद, त्याला आंत घेऊन जाऊं या !

**बीना :** नाहींपेक्षां डॉक्टरनां बोलवूं या !

**अरविंद** : जरा थांबा. ( हांक मारतो ) नरेन–अरे ए नरेन !

**नरेन** : कुणीं बरं हांक मारली मला ? ( शुद्ध येऊन डोळे उघडतो ) अरुदादा–माझा अरुदादा ( कोचावर बसलेल्या अवस्थेंत मिठी मारतो ). अरुदादा, अरे माझी आई जिवंत आहे !

**अरविंद** : कुणीं सांगितलं तुला नरेन ?

**नरेन** : दामुअण्णानीं !

**आबा** : ( आश्चर्यानें ) दामुअण्णानीं ?

**नरेन** : होय. कारण माझी आई दामूअण्णाबरोबर पुनर्विवाह करण्यास प्रवृत्त झाली असतांना, तुम्हीच तिला त्या विचारापासून परावृत्त केलं होतं ना ?

**राज** : म्हणजे आमच्या अण्णांचा व नरेनच्या आईचा ...

**नरेन** : पवित्र संबंध आला होता. पण आबासाहेबांनीं तोडला तो ! आबासाहेबांमुळेंच माझी आई अनीतीच्या मार्गानं गेली आहे–आबासाहेबांमुळेंच अरुदादा मोटार अपघातांत सांपडला आहे—आबासाहेबांमुळेंच तुझं व लिलीचं लग्न होणार नाहीं—

**आबा** : माझ्या पापाचा पाढा वाचून दाखवूं नकोस नरेन !

**नरेन** : तर मग लिली अन् राजच्या लग्नाला संमति द्या–नाहींपेक्षां त्यांच्या पवित्र प्रेमाची राख करून पापाची भर करून घ्या. बोला काय म्हणणं आहे आपलं ?

**आबा** : माझी लिली मी राजला द्यायला तयार आहें ... राजला द्यायला तयार आहें ( आवेगानें उजव्या बाजूच्या खोलींत जातात ).

**नरेन** : अरुदादा, तुझी प्रकृति ठीक नसतांना तूं कां इथं उभा आहेस ? बीनावहिनी, अरुदादाला आंत घेऊन जा ! जा म्हणतों ना. आजची माझी शेवटची आज्ञा तुला मानलीच पाहिजे !

**बीना** : चला अरविंद, निदान त्यांच्या समाधानाकरितां आंत चला– ( बीना अरविंदला धरून आंत घेवून जाते ).

**नरेन** : अच्छा ! लिली, राज येतों मी ( बाहेर जावूं लागतो ).

**राज** : ( त्याला आडवून ) कुठं चाललास नरेन ?

**नरेन :** चंद्राकडे ... वेश्येकडे ... नव्हे माझ्या आईकडे जातों आहें गं ! यापुढं मी इथं रहाणार नाहीं.

**लिली :** भावड्या, मला सोडून जाऊं नकोस रे !

**नरेन :** ( गहिंवरून ) पण मी तुझा भावड्या नाहीं लिली ! आबासाहेबांच्या खेलीचा मुलगा आहें !! जाऊं दे लिली—मला इथं रहायचं नाहीं. मला माझ्या आईला भेटायला जाऊं दे. मला माझी आई हवी आहे !!

**राज :** शांत हो ! नरेन शांत हो !

**लिली :** भावड्या, नको रे असा बडबडूंस—( स्फूंदूं लागते. )

**नरेन :** पण तूं कां रडते आहेस ? माझी आई मला प्रेमानं जवळ घेईल म्हणून तुला वाईट वाटतं आहे का ? तिनं जर एका कुशींत मला ओढून घेतलं तर दुसऱ्या कुशींत ती तुला स्वतःची मुलगी म्हणून जवळ ओढून घेईल ! रडूं नकोस तूं लिली ! जातों हं मी. वाईट वाटून घेऊं नकोस ! ( जाऊं लागतो. )

**राज :** नरेन, असं वेडयासारखं करूं नये, मागं फीर नरेन !

**नरेन :** राज, मला माझ्या आईला भेटायला गेलंच पाहिजे. आज मी मातृप्रेमाचा खजिना लुटणार आहें ! मातृप्रेमावर डाका घालणारा दरोडेखोर बनणार आहें !! चंद्राला—एका वेश्येला ' आई ' अशी हांक मारून कडकडून मिठी मारणार आहें !!! ( बेभान होऊन ) मला आई पाहिजे—मला आई पाहिजे ... कुणीं तरी मला आई द्या हो—कुणींतरी मला आई द्या ... मातृप्रेमाची भीक मागतों आहें मी—( ओरडतो ) आई ऽऽऽ ( लिली व राज ' नरेन ' असा कल्लोळ करतात. नरेन भेसूरतेनें बोलतो ) काय झालं ?... ' नरेन ' अशीं कुणीं बरं मला हांक मारली ? आजूबाजूच्या भिंतींतून माझ्या आईचा आवाज तर माझ्या कानांवर आला नाहीं ना ? होय, माझ्या आईचीच हांक मला ऐकूं येते आहे. राज, लिली ह्या घराच्या भिंती फोडून टाका, त्यांतून माझ्या आईचा आवाज मला ऐकूं येतो आहे. आवाज ऽऽ माझ्या आईचा आवाज !

**लिली :** भावड्या—

**नरेन :** ( अधिरतेनें ) घाबरूं नकोस आई, तुझ्यावर चालून येणाऱ्या संकटाचा प्रतिकार करायला, तुझ्याच उदरांतून जन्माला आलेला हा पापाचा गोळा वायुवेगानं तुझ्याकडे धावून येतो आहे. आई ऽऽ आई ऽऽऽ ( अवेगानें बाहेर जाऊं लागतो. राज अडवतो. )

**राज :** नरेन, काय चालवलं आहेस तूं हें !

**नरेन :** कुठं काय ?...कांहीं नाहीं...कांहीं नाहीं.

**राज :** अरे हो ! आज तुझं नाटक आहे नाहीं ? दाखवणार ना तुझं नाटक आम्हांला ?

**लिली :** भावड्या, चल आपण तुझ्या नाटकाला जायची तयारी करूं या !

**नरेन :** माझं नाटक ! यापेक्षां निराळं असं काय दिसणार आहे तुला माझ्या नाटकांत ? लिली, हेच प्रसंग-हींच दृश्यं तुला त्यांत पहायला मिळतील ! आपल्या अरुदादासारखा विधवांचा उद्धारकर्ता त्यांत तुला दिसेल ! ! वाघाचं कातडं पांघरून समाजसुधारणेचा डांगोरा पिटणारे-स्वतःला प्रतिष्ठित समजणारे आबासाहेबांसारखे लांडगे तुला त्यांत दिसतील !!! राज दिसेल - लिली, तूं दिसशील ! माझ्या बीनावहिनीसारखी सोज्वळ वहिनी देखील तुला दिसेल ! ! इतकंच नव्हे तर आबासाहेबांसारख्या नीच माण-सांनीं भ्रष्ट करून वेश्या बनविलेल्या, माझ्या आईसारख्या कित्येक स्त्रिया तुला त्यांत दिसतील ! ! माझी आई ! काय म्हणूं मी माझ्या आईला ? आई ऽऽऽ ( इतक्यांत गाण्याच्या ओळीं ऐकूं येतात. )

हांक मारिते बालक निज मातेला
सांग आई असशी कुठं क्षणीं या
आई ऽऽ आई ऽऽऽ आई ऽऽऽऽ

( ओळी संपतां संपतां राज व लिली नरेनला धरून आंत घेऊन जातात. रंगभूमीवर अंधार पसरतो. )

॥ समाप्त ॥